बाकी वर्ज्य. ( ४० ) नखुडें व पेरें यांजवर--कडूनिंबाचा पाला थोडें मीठ घालून वाटावा व तुपांत परतून त्याची पिंडी वर बांधावी. ( ४१ ) विषमज्वरावर--कडूनिंबाचा पाला ४० तोळे, सुंठ मिरी पिंपळी १२ तोळे, त्रिफळा १२ तोळे, लवणत्रय ( सैंधव, बिड, काच ) १२ तोळे दोन क्षार ( जवखार, सज्जीखार ) ८ तोळे, व ओंवा २० तोळे, या सर्वांचें चूर्ण एकत्र करून प्रातःकाळीं द्यावें. ( ४२ ) विषमज्वरावर धूप--कडूनिंबाचा पाला, वेखंड, कोष्ठ, हरीतकी, शिरस, तूप व गुग्गुळ यांचा धूप विषमज्वरनाशक आहे. ( ४३ ) आगंतुक व्रण व गळवें यांवर--कढईंत तेल घालून त्यांत कडूनिंबाचा पाला जाळून खलून लावावा.

( ४४ ) विंचवाचे दंशावर--कडूनिंबाचीं पानें अगर फुलें ओढावीं; अथवा पाला चावून तोंडांतील वाफ जाऊं न देतां दंशाच्या विषमभागाकडच्या कानांत तो फुंकावा.

## ९ कडु पडवळी. ( सं. कटु पटोल ).

कडूपडवळीचे वेल पडवळीप्रमाणेंच होतात. या वेली पर्जन्यकाळीं बहुतेक प्रांतीं होतात. हीं फळें आकारानें तोंडल्याएवढीं असतात. या वेलाचा पाला व फळें ही फार कडू आहेत. काढ्यांत या वेलाच्या पंचांगांचा उपयोग होतो.

**कडू पडवळीः**--कडू, सारक, उष्ण, तिखट, भेदक, पाचक, अग्निदीपक; व पित्त, कफ, कुष्ठ, रक्तविकार व ज्वर, दाह, तृष्णा, कोष्ठरोग, कृमि यांचा नाश करिते. हिचें फळ तिखट, कडू, पाककाळीं गोड, लघु, दीपन, पाचन, वृष्य, मलानुलोमन; व वायु, पित्त, कफ, यांना यथास्थानीं ठेवणारें, सारक; व श्वास, ज्वर, त्रिदोष, कृमि यांचा नाश करितें. हिचीं पानें पित्तनाशक; आणि मूळ, वल्ली व तेल हीं कफनाशक आहेत.

( १ ) व्रण धुण्यास काढा--कडूपडवळ व कडूनिंब यांच्या काढ्यानें व्रण धुवावे; म्हणजे व्रणांची शुद्धि होते. ( २ ) अग्निदग्धव्रणांवर--कडूपडवळीचा काढा व कल्क यांनीं शिरसाचें तेल सिद्ध करावें. तें अग्निदग्धव्रण, ठणका, स्राव, दाह व फोड यांचा हटकून नाश करितें. ( ३ ) सर्व

**ज्वरांवर काढा**:—कडू पडवळ व सुंठ यांचा काढा व निकाढा घ्यावा. शोष असल्यास खडीसाखर घालावी. सर्दीचा प्रादुर्भाव असल्यास मध तीन मासेपर्यंत घालावी. ( ४ ) **शीतज्वर व संततज्वर**—कडू पडवळीच्या पाल्याचा रस काढून प्रथम काळजावर लावावा; नंतर सर्व अंगास लेप द्यावा. ( ५ ) **इंद्रलुप्त अथवा चाईवर**—कडू पडवळीच्या पाल्याचा रस चोळावा. म्हणजे केश उत्पन्न होतात. ( ६ ) **वमन होण्यास**—कडूनिंब व अडुळशाचीं पानें यांचें चूर्ण थंड पाण्यांत द्यावें; म्हणजे वमन होऊन पित्तविकार दूर होतो. ( ७ ) **कृमीवर**—कडू पडवळीचीं पानें १ तोळा व धने १ तोळा हीं रात्रीं पावशेर पाण्यांत भिजत घालून सकाळीं गाळून त्यांत मध घालून तें पाणी निम्में तीन तीन वेळ प्यावें. ( ८ ) **पित्तज्वरावर**—कडू पडवळीच्या मुळाचें पाणी साखरेशीं द्यावें. अथवा कडूपडवळ व जव यांचा काढा मध घालून द्यावा. तो तीव्र पित्तज्वर, तृषा व दाह ह्यांचा नाश करितो. ( ९ ) **भ्रमावर**—कडुपडवळीचा पाला व शेवग्याचा पाला थोडें खोबऱ्याचें तेल घालून तळावा, आणि दुधाशीं एकत्र वाटून शिजवावा; व त्याचा सोसेल तितका गरम पेंड मस्तकावर बांधावा. ( १० ) **विषावर**—कडूपडवळ उगाळून द्यावें. म्हणजे उलटी होऊन विष उतरतें.

## १० कडु भोंपळी ( सं. कटुतुंबी ).

दुध्या भोंपळ्याचे जसे वेल होतात तसेच कडु भोंपळ्याचेही मोठ मोठे वेल होतात. दुध्या भोंपळ्याप्रमाणेंच या वेलीवर फळें येतात. हे भोंपळे फार कडू असतात. या भोंपळ्यांचा पोहण्याकडे व सांगडी करण्यास फार उपयोग होतो. यांतील कित्येक भोंपळे तुंबडीवजा असतात. त्यांच्या तुंबड्या करितात. कित्येकांचे तंबुरे करितात. असा याचा पुष्कळ उपयोग होतो.

कडूभोंपळी—रसकाळीं व पाककाळीं तिखट, हृद्य, शीतळ, कडु, वामक; दमा व खोकला यांची नाशक, शोधनकारक; व वायु, सूज, व्रण, विष, शूल व पित्तज्वर यांचा नाश करिते. हिचीं पानें पाककाळीं

मधुर, मूत्रशोधक व पित्तशामक अशीं आहेत. याप्रमाणें फळाचेही गुण आहेत. ( १ ) **गालगुंडावर**–पिकलेल्या कडू भोंपळ्यांत ७ दिवस पाणी भरून ठेवावें. तें प्राशन केलें असतां गालगुंडाचा नाश होतो. ( २ ) **सर्व प्रकारच्या विषांवर**—कडूभोंपळ्याचें मूळ अथवा पानें पाण्यांत वाटून प्यावीं, म्हणजे वमन होऊन सर्व विषें उतरतात. ( ३ ) **रातांधळें व फुलें झडण्यास**—कडू भोंपळा जाळून त्याची राख मधांतून डोळ्यांत घालावी. ( ४ ) **गंडमाळेवर**—कडू भोंपळ्याचा रस व शिरसेल एकत्र करून अग्नीवर कढवावें व रस जळून तेल सिद्ध झालें म्हणजे तें लावावें. ( ५ ) **कामिणीवर**–कडूभोंपळ्याचे पानांचा काढा करून द्यावा. ( ६ ) **योनिसंकोचनास**—कडूभोंपळीचें बीं व लोध्र हीं पाण्यांत वाटून योनीस आंतून लेप करावा. ( ७ ) **काविळीवर**—कडूभोंपळ्याची बी पाण्यांत उगाळून नस्य द्यावें.

### ११ कढीनिंब ( सं. कैटर्य ).

हें झाड फार मोठें होत नाहीं. हीं झाडें बागेंत लावितात. या झाडास बारीक कांटे असतात. याचा पाला सुगंधि आहे. हा पाला मसाल्यांत घालितात. कढीनिंबाचा पाला तूप लावून चुलींत होरपळून कढींत घाल-तात, तेणेंकरून कढीस या पाल्याचा वास लागून ती चांगली लागते. यास “ गोड निंब ” असेंही म्हणतात.

**कढीनिंब**—शीतळ, कडू, तिखट, तुरट व लघु असून दाह, अर्श, कृमि, शूल, संताप, विष, सूज, कोड व भूतबाधा यांचा नाशक आहे.

### १२ कण्हेर ( गु. कण्हेर, सं. करवीर ).

हें फूलझाड सर्वत्र प्रसिद्ध आहे. याची उंची सुमारें पुरुष दोन पुरुष असते. यांत पांढरी, तांबडी, गुलाबी व पिंवळी अशा चार जाती आहेत; पैकीं पांढरी कण्हेर औषधाच्या कामीं जास्त गुणावह आहे. हिचीं मुळें फार विषारी आहेत. हिचीं पानें लांबट असतात. हिच्या फुलांस वास नसतो. या झाडाजवळ सर्प येत नाहीं असें म्हणतात.

**श्वेतकण्हेर**–तिखट, कडू, तुरट, तीक्ष्ण, उष्णवीर्य व ग्राहक अशी

आहे; व मेह, कृमि, कुष्ठ, व्रण, अर्श व वायु यांचा नाश करिते; भक्षण केली असतां विष आहे; नेत्रांला हितावह, लघु; व विष, विस्फोट, कुष्ठ कृमि, कंडू, व्रण, कफ, ज्वर, नेत्ररोग यांचा नाश करिते. **रक्तकण्हेर**—शोधक, तिखट, पाककाळीं कडू व लेप केला असतां कुष्ठनाशक आहे. **पाटलवर्ण कण्हेर**—मस्तकशूल, कफ व वायु यांचा नाश करिते. ( १ ) **सर्प, विंचू व फुरसें यांच्या विषावर**—पांढऱ्या कण्हेरीचें मूळ उगाळून दंशावर लेप करावा, अथवा मूळ उगाळून शक्तीप्रमाणें पाजावें; किंवा पानांचा रस पाजावा. कदाचित् या औषधापासून ग्लानि आल्यास तूप पाजावें. ( २ ) **उपदंशावर**—कण्हेरीचें मूळ उगाळून त्याचा लेप करावा, म्हणजे असाध्यही पीडा दूर होते. ( ३ ) **विषमज्वरावर**—पांढऱ्या कण्हेरीची मुळी आदितवारीं आणून कानास बांधावी. हा योग सर्व ज्वरांवर प्रशस्त आहे. ( ४ ) **मूळव्याधीवर**—कण्हेरीचें मूळ उगाळून लेप करावा. ( ५ ) **धांवऱ्यावर**—तांबड्या कण्हेरीचीं फुलें आणि तांदूळ वजन करून समभाग घेऊन, रात्रौ थंड पाण्यांत भिजत घालून, तें भांडें दवांत उघडें ठेवावें. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं ते तांदूळ व फुलें एकत्र वाटून त्याचा लेप द्यावा. ( ६ ) **शिरोरोगावर**—पांढऱ्या कण्हेरीची मुळी सहाणेवर सुकी उगाळून, ती पूड वेदनायुक्त अशा मस्तकाच्या भागावर चोळावी. ( ७ ) **सर्पाचे विषावर**—पांढऱ्या कण्हेरीचीं फुलें वाळवून, त्याचे समभाग कडक तंबाकू आंत मिसळून त्यांत थोडी वेखंडाची पूड टाकून तें चूर्ण वस्त्रगाळ करून ठेवावें व तपकिरी-सारखें ओढावें.

## १३ कनक.

कनक हा कंद आहे. याचा वेल फार मोठा होत नाहीं. याचा विस्तार-ही फार मोठा होत नाहीं. वेल बारीक असून पानें वाटोळीं असतात. तीं लहानशा विड्याच्या पानाएवढीं असतात. पानास टोंक असतें. वेलास बटाट्याप्रमाणें जमिनींत कनकें येतात. हा कंद रताळ्यापेक्षां जाड असतो. लांबींत तितकाच भरतो. कनकास कोणी 'कणगर,' 'कणगी,'

' कांटेकणग्या ' असेंही म्हणतात. कनकें भाजून अथवा उकडून खातात. हें निराहारास उपयोगीं पडतें. कारंदा व कोन यांपेक्षां हें गोड असतें. हें पौष्टिक आहे.

( १ ) मूळव्याधीवर व रक्तातिसारावर—कनक भाजून तूपसाखरेशीं रोज सकाळीं खावयास द्यावें.

## १४ कमळ. ( सं. कमल ).

कमळाची उत्पत्ति तळ्यांत किंवा तळ्याप्रमाणें एखाद्या जलसमूहांत बहुतकरून होते. पाण्याशिवाय कमळ व्हावयाचें नाहीं. याचे कांदे असतात. यास देंठ येऊन त्यावर फूल येतें. याचे देंठ फार लांब असतात. त्यांस आंतून जाळी असून ते अगदीं पोकळ असतात. याचें पान वाटोळें असतें. कमळांत पुष्कळ जाती आहेत. पांढरें, तांबडें, गुलाबी, निळें, इत्यादि. कमळाचें फूल फारच शोभिवंत दिसतें. त्यास अनेक लांबट पाकळ्या असून त्या जवळजवळ असतात. निरनिराळ्या जातींची निरनिराळी लहान मोठी अशी आकृति असते. कांहीं जातींस वास येतो व कांहींस अगदीं येत नाहीं. कल्हार म्हणून एक कमळाची जात आहे, तिचीं पानें कमळासारखीं पण किंचित् लहान असतात. कल्हाराचें फूल मात्र कमळापेक्षां अगदीं निराळ्या तऱ्हेचें असतें. हें फूल पांढरें असून सुकुमार व लहान असतें. याला सुवास फार आहे. याला पावसाळ्यांत फुलें फार येतात. कुमुद म्हणून जी एक कमळाची जात आहे, तिचीं पानें कमळाप्रमाणेंच असतात. फूल मात्र बारीक व फार सुकुमार असतें. याच्या फुलांचा भर थंडीच्या दिवसांत फार असतो. विशेषेंकरून पांढऱ्या कमळास " पुंडरीक " म्हणतात. रक्तकमलास " कोकनद " म्हणतात. नील कमलास ' इंदीवर ' असें म्हणतात. कमळाच्या सर्व वेलांस " कमलिनी " असें म्हणतात. कमळाक्ष म्हणून एक कमळाची जात आहे. त्या जातीच्या कमळाचे देंठ पांढरे असून, कोठें कोठें पायाच्या आंगठ्याएवढे जाड असतात. जे देंठ चिखलांत रुतलेले, त्यांस स्वाद अधिक असतो. या देंठास भिसें असें म्हणतात. या कमळाचीं पानें मोठ्या छत्रींसारखीं

असून ती जेवावयास उपयोगीं पडतात. या कमळाचीं कमळें तांबड्या रंगाचीं असतात. या कमळास " पोयसर " असेंही नांव आहे. या कमळांस लहान चपटें फळ येतें. त्यांत पांच सहा लहान करवंदायेवढ्या बिया असतात. त्यांस ' कमळाक्ष ' अथवा ' कमळकांकडी ' असें म्हणतात. या बियांच्या आंत जो पांढरा मगज असतो तो फोडून खातात. कमळाक्षाच्या काशींत लाह्या करितात. त्या दुधांत घालून खातात किंवा त्यांचें पीठ करून त्यांत तूपसाखर घालून लाडू बांधितात. कमळाक्ष फार पौष्टिक आहे. भिशाचे लहान लहान तुकडे करून ते सुकवितात. त्या भिशाच्या कचऱ्या होत. त्या तुपांत व तेलांत तळून खातात.

**कमळ**—शीतळ, स्वादु, सुगंधी, भ्रांतिहारक, तापनाशक, वर्णकर व तृप्तिकर असें आहे; व रक्तपित्त, श्रम, कफ, पित्त, तृषा, दाह, विस्फोट, रक्तदोष, विसर्प व विष यांचा नाश करितें. (१) **गुदभ्रंशावर**—कमळाचीं कोंवळीं पानें साखरेबरोबर खावीं. (२) **अंगांत भिनलेली सर्व प्रकारची गर्मी झडून जाण्यास व धातु पडत असल्यास**—पांढऱ्या कमळाचा कंद आणून ठेवावा; म्हणजे त्यांतून जो वलक येईल तो पावशेरपर्यंत घेऊन त्यांत आपट्याच्या अंतरसालीचें चूर्ण अर्धा तोळा व गाईचें दूध घालून, सर्व मिश्रण सारखें करावें; नंतर जिऱ्याची पूड व खडीसाखरेची पूड घालून द्यावें. हें औषध निस्तोष गुण येईपर्यंत द्यावें.

(३) **तिडक्या प्रमेहावर व थंड्या प्रमेहावर**—पांढऱ्या कमळाच्या कंदाचें पीठ करून नित्य सकाळीं गाईचें तूप एक तोळा घेऊन त्यांत हें पीठ अर्धा तोळा, जिऱ्याची पूड तीन गुंजा व खडीसाखर ६ मासे घालून प्रत्यहीं टुक्क द्यावें. (४) **दाहावर**—कमलपत्रें व केळीचीं पानें यांजवर शयन करावें. (५) **पित्तज्वरावर**—पांढऱ्या कमळाच्या पाकळ्या, जेष्ठमध व खडीसाखर यांचा काढा करून थंड झाल्यावर द्यावा.

## १५ कपुरी मधुरी [ सं. स्पृक्का ].

हें झाड सुमारें एक हात उंच वाढतें. याचीं पानें तुळशीच्या पानांप्रमाणें असून तीं पांढुरकीं असतात. यास तुळशीप्रमाणें तुरे येतात. हीं

झाडें पुणें व नाशिक जिल्ह्यांत केळीच्या बागांतून जास्त होतात.

**कपुरीमधुरी**—तिखट, कडू, तुरट, स्वादु, शीतळ, वृष्य, सुगंधि; व खोकला, तृषा, मेह, कंडू, त्रिदोष, कुष्ठ, विषदोष, ज्वर, कफ, स्वेद, दाह, रक्तदोष, दुर्गंधि, अश्मरी, मूत्रकृच्छ्र व शूळ यांचा नाश करिते.

( १ ) **पूपरम्यावर**–कपुरीमधुरीच्या पाल्याचा अंगरस ७ दिवस द्यावा.

( २ ) **मधुरा व विषमज्वर यांवर**–हिच्या पानांचा काढा द्यावा.

## १६ करडई ( सं. कुसुंभ. )

करडईचें झाड टोंपराइतकें किंवा कंबरेइतकें उंच वाढतें. याचीं पानें लांबट असतात. त्यांस बारीक कातरा असतो. करडईस पिंवळ्या रंगाचें फूल येतें. त्यांत केशराप्रमाणें तंतु असतात. या फुलाच्या मागें मोठ्या सुपारीएवढें बोंड येतें. त्यास टोंक असतें. या बोंडांत करडईचे दाणे असतात. या झाडास व बोंडावर कांटे असतात. करडई देशावर फार पिकते. करडईंत दोन जाती आहेत; एक कांट्यांची व दुसरी बिन कांट्यांची. बिनकांट्यांच्या करडईचीं फुलें कढवून वाळवितात व त्यांचा कुसुंबा करितात. तो रंगास उपयोगीं पडतो. हीं फुलें काढल्यामुळें करडईच्या पिकास अपाय होतो. करडईच्या बियांचें तेल काढतात; तें खावयास व जाळावयास उपयोगीं पडतें. पेंड गुरांस खावयास घालतात. कोंवळ्या करडईच्या पाल्याची भाजी करितात. करडईचें तेल बलकर व वीर्यवर्धक आहे.

**करडई**—वातुळ, रूक्ष, विदाही व तिखट आहे; व मूत्रकृच्छ्र, कफ, रक्तपित्त यांचा नाश करिते. **करडईचें फूल**–स्वादु, त्रिदोषनाशक, भेदक, रूक्ष, उष्ण, पित्तकर, केशरंजनकारक, कफकारक व लघु आहे. **करडईची भाजी**–मधुर, नेत्र्य, उष्ण, तिखट, अग्निदीपक, अतिरुचिकर, रूक्ष, गुरु, सारक, पित्तकर, आंबट व गुदरोगकारक आहे; व कफ, मल, मूत्र, व मेद यांचा नाश करिते. **करडईचें तेल**–बलकर, खारट, कडु, विदाही अचक्षुष्य, गुरु, तीक्ष्ण, मलस्तंभक, रक्तपित्तकारक, आंबट, त्रिदोषकारक आणि कृमि व वायु यांचें नाशक आहे.

## १७ करंवळ ( सं. भव्य. )

करंबळाचीं झाडें मोठमोठीं होतात. हीं झाडें कोंकणप्रांतीं पुष्कळ आहेत. या झाडाचें पान मोठें असून, हें हात सव्वा हात लांब असतें. याचीं पानें एकत्र जोडलीं असतां एक मोठी पत्रावळ तयार होते. याच्या पत्रावळी करितात.

(१) गर्भांतिल उष्णतेमुळें मुलांच्या अंगाची त्वचा जाते त्यास—करंबळाचे सालीचा रस तोळे २, जाईचे पाल्याचा रस तोळे २, पांढरा कात तोळे २, शंखजिरें तोळा १, शेंदूर मासे ६, जेष्ठमधाचा शिरा मासे ६, व गाईचें लोणी तोळे ८ हीं सर्व एकत्र खलून तयार झाल्यावर हें औषध कापसाच्या बोळ्यानें मुलाच्या अंगास लावावें हें सतत ३ दिवस, दिवसांतून दोन वेळां लावावें. चवथे दिवशीं दूध व तूप एकत्र करून मुलाचे अंगास लावून स्नान घालावें. (२) पाय वळतात त्यास —करंबळाचे सालीचा रस काढून त्यांत काळी मिरें बारीक वाटून पायांस लेप करावा व वर करंबळाचें पान घालून त्यावरून वस्त्राचें वेष्टन द्यावें. याप्रमाणें एक दोन वेळ करावें, म्हणजे गुण येतो. (३) अतिसारावर— करंबळाची साल दह्यांत उगाळून द्यावी.

## १८ करंज.

हें रानझाड आहे. याचीं झाडें छायेसाठीं रस्त्याच्या बाजूस लावतात. याची छाया फार गार असून लोकांस फार प्रिय आहे. ही छाया फार दाट असते. त्याच्या बियांचें तेल निघतें; तें जाळावयास चांगलें उपयोगीं पडतें.

करंज—पाककाळीं तिखट, नेत्र्य, उष्ण, रसकाळीं कडू व तुरट असा आहे; व तो उदावर्त, वायु, योनिदोष, वातगुल्म, अर्श, व्रण, कंडू, कफ, विष, विचर्चिका, पित्त, कृमि, त्वग्दोष, उदर, मेह व प्लीहा यांचा नाश करितो. याचें फळ—उष्ण व लघु आहे; व मस्तकरोग, वायु, कफ, कृमि, कुष्ठ, अर्श, मेह यांचा नाश करितें. याचें तेल—वातनाशक, कृमिनाशक व अति स्निग्ध आहे, व दिव्यांत जळण्याविषयीं थंड आहे. हें

कडू, उष्ण, व्रणाला भरणारें; व नेत्ररोग, विचर्चिका, वायु, कुष्ठ, व्रण, कंडू, गुल्म, उदावर्त, योनिदोष, अर्शरोग, व लेपानें अनेक त्वग्दोष, यांचा नाश करितें. ( १ ) **उंदरादिकांच्या विषावर**—करंजाची साल व बी उगाळून लेप करावा, म्हणजे विष उतरतें. (२) **खरजेस**—करंजाचें तेल व कापूर अथवा निंबाचा रस एकत्र खलून खरजेस लावावें, म्हणजे खरूज, कंडू इत्यादि रोग दूर होतात. ( ३ ) **अंडवृद्धीवर व गंडमाळेवर**—तांदुळाच्या धुणांत करंजाचें मूळ उगाळून लेप द्यावा. (४) **मोहरीवर म्हणजे मुंग्या येतात त्यांवर**—करंजेल तेलांत कडू सुरणाच्या फोडी घालून तें तेल कढवावें व मेहरी आलेल्या भागावर लावावें.

(५) **पित्त पडण्यास**—करंजाची साल खाण्यास द्यावी, अगर सालीचा रस द्यावा. ( ६ ) **व्रणसंबंधीं कृमि दूर होण्यास**—करंज, कडूनिंब व निर्गुडी यांचीं पानें वाटून लेप करावा. ( ७ ) **फुलें, मांसवृद्धि, भूरी इत्यादिकांवर**—करंजबीजाचें चूर्ण करून, पळसाचे फुलांचा रस काढून, त्या चूर्णाला त्या रसाचीं बहुत पुटें देऊन बारीक खलून वातीसारख्या लांबट गोळ्या बांधाव्या. ती गोळी पाण्यांत उगाळून अंजन करावें म्हणजे वरील सर्व नेत्ररोग शस्त्रानें कापून काढल्यासारखे दूर होतात. (८) **अर्धशिशीवर**—करंजाची बी गरम पाण्यांत उगाळून त्यांत थोडा गूळ कालवावा व त्याचें नस्य द्यावें. ( ९ ) **खवड्यांस**—रिठ्याच्या पाण्यानें खवडे धुवून टाकावे व करंजाचें तेल, निंबाचा रस व कडव्या कवठीच्या बियांचें तेल एकत्र करून मस्तकास चोळीत जावें. (१०) **उरुस्तंभावर**—करंजाचें मूळ अथवा साल उगाळून, गरम करून लेप द्यावा. ( ११ ) **ओकारीवर**—करंजाची बी किंचित् भाजून तुकडे करून वारंवार खावी.

### १९ करटोल ( सं. कर्टोली, कर्कोटकी, गु. कंटोळो. )

करटोलीचे वेल पावसाळ्यांत रानांत होतात. हे झुडपाच्या आश्रयानें असतात. याचा वेल पांच दहा हात लांब पसरतो. याचे कांदे जमिनींत असतात. पाऊस पडला म्हणजे त्यांस अंकुर फुटून त्याचे वेल होतात. या वेलांस आषाढाच्या सुमारास फळें येतात. हीं फळें रंगानें

हिरवीं असून त्यांवर कांटे असतात. याची भाजी चांगली होते. ही भाजी पथ्यकर असून स्वादिष्ट आहे. ज्या कर्टोलीच्या वेलास फक्त फुलेंच येतात, फळें येत नाहींत, त्या वेलास "वांझ करटोल" असें म्हणतात. करटोलीचे वेल बहुतकरून डोंगराळ जमिनींत होतात.

**करटोल**–रुचिकर, तिखट, अग्निदीपक, कडू व उष्ण अशी आहे; व वायु, कफ, विष व पित्त यांचा नाश करिते. हिचें फळ–मधुर, लघु, पाककाळीं तिखट, अग्निदीपक आहे; व गुल्म, शूल, पित्त, त्रिदोष, कफ, कुष्ठ, खोकला, मेह, दमा, ज्वर, किलासकुष्ठ, लालास्राव, अरुचि व हृद्रोग यांचा नाश करितें. हिचें पान रुचिकर, वृष्य व त्रिदोषनाशक आहे, व कृमि, ज्वर, क्षय, दमा, खोकला, हिका व अर्श यांचा नाश करितें. हिचे कंद मधाशीं मस्तकरोगावर प्रशस्त आहेत. **वांझ कर्टोली**–कडू, तिखट, उष्ण, लघु, रसायन व शोधन असून स्थावरादि विष, कफ, नेत्ररोग, शिरोरोग, व्रण, विसर्प, खोकला, रक्तदोष व सर्व विषें यांचा नाश करिते.

(१) **पालीच्या विषास**–कर्टोलीचा कांदा पाण्यांत उगाळून ७ दिवस प्यावा. (२) **खर पडते त्यावर व मूत्रकृच्छ्रावर**–वांझ कर्टोलीचा कांदा एक तोळा मधाबरोबर द्यावा. (३) **आगीमण्यारीचे विषावर**–वांझ कर्टोलीचा कांदा मधांत उगाळून अंजन करावें; अथवा तो उगाळून पाजावा. (४) **स्तनरोगावर**—वांझकर्टोलीचें मूळ गरम पाण्यांत उगाळून लेप करावा. (५) **सर्पाचें विषावर**—वांझ कर्टोलीचा कांदा पाण्यांत उगाळून प्यावा व लेप द्यावा; म्हणजे सर्प, विंचू, मांजर, उंदीर यांचें विष उतरतें. अथवा वांझ कर्टोलीच्या कांद्यास शेळीच्या मूत्राच्या भावना द्याव्या व तो कांजींत वाटून त्याचें नस्य द्यावें, म्हणजे विष उतरतें. (६) **सर्व विषारांवर**—वांझ कर्टोलीचा कांदा व धोत्र्याची मुळी तांदुळाचे धुणांत उगाळून पोटांत द्यावी व दंशावर लावावी. (७) **विंचवाचे विषावर**—वांझ कर्टोलीचा कांदा व काळ्या भोंपळ्याचा डेंख हे दोन्ही पाण्यांत उगाळून दंशावर लेप द्यावा. (८) **उठाणूस**—कर्टोलीचा कांदा कडू इंद्रावणीचें मूळ व कवंडळीचें मूळ हीं तिन्हीं थंड पाण्यांत उगाळून

वारंवार लेप करावा. ( ९ ) रक्तार्शावर–करटोलीच्या कंदाचें चूर्ण साखरेंत द्यावें. ( १० ) अपस्मारावर—वांझ करटोलीचें मूळ तुपांत उगाळून त्यांत साखर घालून त्याचें नस्य द्यावें. ( ११ ) वातज मस्तकशूलावर–करटोलीचा कांदा मधांत उगाळून लेप करावा. ( १२ ) पानथरीवर—आदितवारीं करटोलीचा कांदा आणून रोग्याकडून तो चुलीवर बांधावा. कांदा सुकत जाईल तशी पानथरीही नळून जाते.

२० करमर [ सं. कर्मर. गु. मुद्रर. ]

हीं झाडें कोंकणप्रांतीं पुष्कळ होतात. करमराचें झाड फार मोठें होत नाहीं. त्याचीं पानें पातळ असून छाया फार थंड असते. हें झाड सर्वकाळ हिरवें असतें व त्यास फळें पुष्कळ येतात. करमराचें लोणचें व मुरंबा चांगला होतो. करमरें गुळचट असतात. त्यांस मिरपूड व मीठ लावलें असतां विशेष रुचि येते. कोणी कोणी पिकलेलीं करमरें तशींच खातात. त्यांचा रंग पिंवळट असतो. त्यांस चोंहों बाजूंस शिरा असतात. हें फळ पिकलें म्हणजे सुंदर दिसतें. हें फळ पित्तनाशक आहे. यास ‘ क्रमक ’ असेंही म्हणतात.

**करमर हिरवें:**—ग्राहक, आंबट, वातनाशक, उष्ण व पित्तकारक आहे. **पिकलेलें करमर**—मधुर, आंबट, बलकर, पुष्टिकर, रुचिकर, व पित्तशामक आहे.

२१ करवंद [ सं. करमर्दक. गु. करमदानूं झाड. ]

हीं कांटेरीं झाडें आहेत. हीं डोंगरांत होतात. यास वाटोळीं बारकीं व काळ्या रंगाचीं फळें येतात. हिरव्या फळांचें लोणचें होतें. याचीं लांकडें फक्त जाळावयास उपयोगीं पडतात. पिकलेलीं फळें चवीला जांभळाप्रमाणें आंबट लागतात. करवंदांत एक कडवी जात आहे.

**करवंद हिरवें**—कडू, अग्निदीपक, गुरु, पित्तकर, ग्राहक, आंबट, उष्ण, रुचिकर, रक्तपित्त व कफ यांना वाढविणारें व तृषानाशक आहे. **पिकलेलें करवंद**–मधुर, रुचिकर, लघु व शीतळ आहे; पित्त, रक्तपित्त, त्रिदोष, विष व वायु यांचा नाश करितें. ( १ ) विषाराची परीक्षा—

करवंदाचें पाळ पाण्यांत उगाळून थोडेंसें पोटांत द्यावें. विषार असल्यास वमन होणार नाहीं. ( २ ) **खरजेस**—कडव्या करवंदीचें पाळ ( मूळ ) पाण्यांत किंवा गोडे तेलांत उगाळून वर लावावें. ( ३ ) **क्षतांतील कृमि मरण्यास**—कडव्या करवंदीचें पाळ पाण्यांत गंधाप्रमाणें उगाळून लेप द्यावा व थोडें पाणी करून क्षतांत सोडावें, म्हणजे त्वरित कृमि नाहींसे होतात. ( ४ ) **सर्पदंशावर**—कडव्या करवंदीचें मूळ पाण्यांत उगाळून पाजावें. ( ५ ) **विषमज्वरावर**—कडव्या करवंदीचें मूळ उगाळून अंगास लेप करावा. ( ६ ) **नळगुदास**—कडव्या करवंदीचें मूळ गोमूत्रांत उगाळून पाजावें.

२२ **कलिंगड** [ गु. तरबूस. हिं. तरबूज. सं. कालिंग. ]

कलिंगडाचे खरबुजाप्रमाणें वेल होतात. यांत दोन जाती आहेतः—एक काळी असून वाटोळी व दुसरी पांढरी असून लांबोडी. पांढरे जातीची कलिंगडें मोठीं असून गोडीस चांगलीं असतात. याच्या पानास पांच टोंकें असून प्रत्येक टोंकामागें दीड अंगुळ खाच असते. कलिंगड भोंपळ्याएवढें होतें. कलिंगड थंड आहे. कोंवळ्या कलिंगडाची भाजी करितात. मारवाड, मथुरा, द्वारका, येथें उत्कृष्ट प्रतीचीं कलिंगडें होतात. यास टरबूज असेंही म्हणतात.

**कलिंगड**—शीतळ, बलकर, मधुर, तृप्तिकर,गुरु, पुष्टिकर,मलस्तंभक, कफकर; व दृष्टि, पित्त, व शुक्र धातु यांचा नाश करितें. तें पिकलेलें खारट व उष्ण आहे; व वायु कफ यांचा नाश करितें. याचें पान—कडू व रक्तवृद्धिकारक आहे. ( १ ) **पुष्टतेस**—कलिंगडाच्या बिया वाटून तो मगज अर्धा तोळा व खडीसाखर अर्धा तोळा एकत्र करून खावें. (२) **दाहावर**—कलिंगड भक्षण करावें. ( ३ ) **उन्हाळ्यावर**—कलिंगडाच्या गिराचें पाणी पावशेर काढून त्यांत जिरें व खडीसाखरेचें चूर्ण घालून द्यावें. ( ४ ) **इंद्रियांस चट्टे पडतात त्यांस**—कलिंगडाची एक चौकोनी कपची काढून त्यांत पावशेर पिठीसाखर घालून त्यावर ती कपची पूर्ववत् बसवून तें रात्रौ दवांत ठेवावें व सकाळीं पाणी प्यावें. म्हणजे

इंद्रियांतील चट्टे, पुटकुळ्या व मूत्रसमयीं आग होणें हे विकार शमन होतात.

२३ कलौंजी ( गु. कलौंजी जीरु. हिं. कलौंजी. सं. उपकुंचिका. )

कलौंजी जिरें हीं कडू जिऱ्याप्रमाणेंच असतात. झाडही तेवढेंच मोठें होतें. उत्तर हिंदुस्थानांत याची उत्पत्ति विशेष होते. हीं झाडें बांगांतून लाविल्यास होतात.

हें जिरें—कडू, तिखट, उष्ण अग्निदीपक, वृष्य, अजीर्णनाशक, गर्भाशयाला शुद्ध करणारें; व आध्मान वायु, गुल्म, रक्तपित्त, कृमि, पित्त, आमदोष, वायु व शूल यांचा नाश करितें. ( १ ) अजीर्ण, अग्निमांद्य, आम व शूल यांवर—कलौंजी जिऱ्याचा काढा करून त्यांत पादेलोणाचें चूर्ण टाकून द्यावें.

२४ कसई ( गु. कासडो. हिं. काश. सं काश. )

कसई " कसाड " असेंही म्हणतात. कसई हें गवत बोरूप्रमाणें आहे. जशीं बोरूचीं बेटें होतात, तशींच कसईचींही होतात. कसईचा कूड घालण्याकडे उपयोग होतो. यास ' कासें गवत ' असेंही म्हणतात. हिचें बीं आकारानें करडीप्रमाणें असून सफेत व कठीण असतें.

कसई—तर्पण, शीत, गौल्य, रुचिकर, बलकारक, मधुर, वृष्य, कडू, पाककाळीं मधुर, सारक व स्निग्ध अशी आहे; व पित्त, दाह, मूत्रकृच्छ्र, क्षय, मूत्राश्मरी, रक्तदोष, रक्तपित्त, क्षतक्षय व पित्तरोग यांचा नाश करणारी आहे. ( १ ) मूत्रकृच्छ्र व मूत्राश्मरी यांजवर—कसईचे मुळांचा काढा मध घालून द्यावा.

२५ कवठ ( सं. कपित्थ, गु. कोंथ. हिं. कैथि. )

कवठाचीं झाडें दक्षिण देशांत व गुजराथेंत फार होतात. हा वृक्ष मोठा होतो. ह्या वृक्षाच्या फळास कवठ असें म्हणतात. तें वाटोळें व आंब्याएवढें असतें. त्याचें कवच कठीण असतें. पिकलेलें कवठ नुसतें किंवा त्यांत गूळ किंवा साखर घालून खातात. हिरव्या कवठाच्या मग-जाचें सार होतें व कोशिंबीर होते. याची चटणीही करितात. पिकलेल्या कवठाचा मुरंबाही होतो.

**कवठीचें झाड**—मधुर, आंबट, तुरट, ग्राहक, शीतळ, वृष्य व कडू आहे; व पित्त, वायु, व्रण यांचा नाश करितें. **याचें हिरवें फळ**—ग्राहि, उष्ण रूक्ष, लघु, आंबट, तुरट, लेखन; व वायु, पित्त, जिह्वाजाड्य यांना करणारें व रुचियर असें आहे; व विष, स्वर, कफ यांचा नाश करितें. पक्क कवठ रुचिकर, आंबट, तुरट, ग्राहक, मधुर, कंठशुद्धिकर, शीतल, गुरु, वृष्य व दुर्जर आहे; व श्वास, क्षय, रक्तरोग, वांति, वायु, श्रम, हिध्मा, विष, ग्लानि, तृषा, त्रिदोष, उचकी, खोकला यांचा नाश करितें. **याचें बीं**—हृद्रोग, मस्तकशूल, विष व विसर्प यांचा नाश करितें. **बियांचें तेल**—तुरट, ग्राहक, गोड आहे; व पित्त, उंदराचें विष, कफ, उचकी व वांति यांचा नाश करितें. **याचें फूल**—विषनाशक व **याचीं पानें**---वांति, अतिसार आणि उचकी यांचा नाश करितात. [ १ ] **पित्ताचें शमन होण्यास**—कवठाचा मगज साखर घालून खावा; अथवा कवठाचे पाल्याचा रस दुधाशीं मिळवून प्यालें असतां, दुर्धर प्रबल झालेलें पित्त शमन होतें. ( २ ) **कामलेवर**—कवठीचे पाल्याचा रस गाईचें दूध घालून पांच तोळेपर्यंत काढावा आणि प्रत्यहीं एक वेळ प्रमाणें द्यावा.

( ३ ) **प्रदरावर**—कवठ व वेळू यांचा पाला समान वाटून तो कल्क मधाशीं द्यावा. ( ४ ) **अंगातील गर्मी, उष्णता वगैरे निघून जाऊन धातुपुष्टि होण्यास**—कवठीच्या पाल्याचें चूर्ण दुधांत खडीसाखर घालून द्यावें. ( ५ ) **उंदराचे विषावर**—कवठाच्या बियांचें तेल लावावें. (६) **अंगावर पित्ताच्या गांधी उठतात त्यास**—कवठीचा पाला बारीक वाटून त्याचा रस गांधींस लावावा किंवा वाटलेला पाला दह्यांत कालवून त्यांत खडीसाखर घालून तो प्यावा; म्ह. एक तासाच्या आंत गांधी मावळतात.

[ ७ ] **अंगांत मुरलेलें रसायन निघण्यास**—कवठीचा पाला, तांदुळ-ज्याचा पाला व केळफुलास ज्या पारंब्या असतात, ज्या गळून पडतात, त्या सर्व समभाग घेऊन, त्याचा अष्टमांश काढा नित्य दोन वेळ प्रमाणें चौदा दिवस द्यावा. दोन्ही वेळ औषधें ताजीं असावीं. तेलकट, आंबट, मीठ, तिखट हे पदार्थ खाऊं नयेत व स्नानही करूं नये. पंधरावे दिवशीं

बकरीच्या लेंड्या गोमूत्रांत वाटून त्यांचा सर्वांगास चार घटका लेप करून ठेवावा. नंतर स्नान करून भोजन करावें. ( ८ ) उचकी व श्वासावर–कवठाचा अंगरस, मधपिंपळीशीं द्यावा. ( ९ ) अन्नद्वेषावर–कवठाच्या गिरांत सुंठ, मिरें व पिंपळी यांचें चूर्ण मध व साखर मिळवून रुचिकर करून तोंडांत धरावें.

## २६ कवंडळ ( सं. चित्रा. )

कवंडळाचे वेल असतात. या वेलावर फळें येतात. त्यांचा प्रथम हिरवा रंग असतो. नंतर तीं पिकलीं म्हणजे त्यांचा सुशोभित तांबडा रंग होतो. हें फळ फारच कडू आहे. शोभेस हीं फळें देवापुढें टांगून ठेवतात. कवंडळाचे गुण इंद्रावणासारखेच आहेत.

( १ ) **कंठसर्प वगैरे कंठरोगांवर**–कवंडळ फळाची साल चिलमींत घालून ७ दिवस ओढावी. ( २ ) **कफ पातळ होण्यास**–कवंडळफळाची साल चिलमींतून ओढावी; म्हणजे वमन होऊन घसा मोकळा होतो. ( ३ ) **काळपुळीवर**–कवंडळाची मुळी व कडू वृंदावनाची मुळी थंड पाण्यांत उगाळून वारंवार लेप द्यावा. ( ४ ) **प्रमेहावर**–कवंडळ त्रिफळा व हळद यांचा काढा निकाढा मध घालून द्यावा. ( ५ ) **अंडवृध्दीवर**–लघु कवंडळीच्या मुळाचें चूर्ण एरंडेलांत खलून दिवसांतून दोन तीन वेळ लावावें; व तेंच चूर्ण दोन दोन मासेप्रमाणें सकाळ–संध्याकाळ गाईच्या दुधांत द्यावें. म्हणजे तीन दिवसांत गुण येतो. ( ६ ) **स्तनरोगावर**–कवंडळाचे मुळांचा लेप द्यावा. ( ७ ) **खरजेवर**—सुकलेलीं कवंडळें जाळून त्यांची राख करून तिळाचे तेलांत खलून लावावी.

## २७ कवला. ( सं. कलाय. )

कवल्याची भाजी कोंकणांत प्रसिद्ध आहे. हें झाड सुमारें वीतभर उंच वाढतें. हीं झाडें रानांत आपोआप होतात. श्रावणी सोमवारच्या दिवशीं कित्येक लोक ही भाजी अवश्य खातात. या भाजींत कांदा घालून केली असतां ती चांगली होते.

**कवला भाजी**–भेदक, उष्ण, कडू व त्रिदोषघ्न अशी आहे.

## २८ कळंब ( सं. कदंब. गु. हिं. कदंब. )

कळंबाचें झाड मोठें होतें. हें झाड सर्वत्र प्रसिद्ध आहे. याचीं पानें मोठीं असून रुंद असतात. या झाडास गोंद येतो.

**कळंब**—तिखट, कडू, तुरट, खारट, शुक्रवर्धक, शीतल, गुरु, विष्टंभकारक, रुक्ष, स्तन्यप्रद, ग्राहक, वर्णकर असा आहे; हा रक्तरोग, पित्त, कफ, व्रण, दाह, विष, मूत्रकृच्छ्र व वायु यांचा नाश करितो. ( १ ) **लहान मुलांस तान पडते त्यावर**—तान्हेचीं लक्षणें अशीं होतात कीं, मुलांस ताप येतो; कानांच्या पाळी व नाकपुड्या अगदीं लिबलिबीत होतात; वरचेवर मलद्वारानें पाणी पडतें; तृषा फार लागते, तालुस्थान उडतें. असा प्रकार झाला असतां त्यावर, कळंबाचे सालीचा, थोडें थंड पाणी घालून रस काढावा व त्यांत जिरें व खडीसाखर घालून पोटांत द्यावा; व हाच रस ताळवेवर ५।६ वेळां चोळावा. याप्रमाणें तीन दिवस करावें. नंतर चौथे दिवशीं त्यास स्नान घालून ताळवेवर कारळ्याचें तेल घालावें. कळंबाची साल पाण्यांत उगाळून, त्याचें स्नानही घालावें. ( २ ) **डोळे येतात त्यास**—कळंबाचे सालीचा रस काढून त्यांत अफू व तुरटी घालून निंबूरसांत खलून, ऊन करून हा खता डोळ्यांवर घालावा. ( ३ ) **मुखरोगावर**—कळंबाच्या सालीच्या काढ्याच्या गुळण्या कराव्या.

## २९ कळलावी. ( गु. कलगारी. हिं. करिहारी. )

कळलावीचें झाड प्रथम जाड गवताप्रमाणें असून वेलीप्रमाणें पसरतें. हिचीं पानें आल्याच्या पानांप्रमाणें असतात. ही बहुधा कुंपणाचे आश्रयानें होते. कळलावीच्या जुनाट झाडाची जाडी करदळीच्या झाडाएवढी असते. हीं झाडें उन्हाळ्यांत सुकून जातात. हिच्या फुलांच्या पाकळ्या लांब असून फूल जास्वंदीच्या फुलाएवढें असतें. हीं फुलें तांबडीं, पिंवळीं, पांढुरकीं अशीं रंगीबेरंगी असतात. या फुलांच्या योगानें झाडही दुरून मोठें शोभिवंत दिसतें. हिचा कंद विषारी आहे. हीस " खड्या नाग " किंवा " वागचबका " असेंही म्हणतात. कोंकणांत हीस कोणी ' कलई ' ' कळवी ' असेंही म्हणतात.

**कळलावी**—सारक, कडू, तिखट, खारट, पित्तकर, तीक्ष्ण, लघु व तुरट आहे; व कफ, वायु, कृमि, बस्तिशूल, विष, अर्श, कंडू, व्रण, सूज, शोष, शूल, शुष्कगर्भ व गर्भ यांचा नाश करिते.

( १ ) **काखमांजरीस व नारूस**—कळलावीचा कंद जाळून लावावा. नारूचा उगम होतांच हा उपाय करावा. ( २ ) **अपची गंडमाळेचे भेद या रोगावर**—कळलावीच्या कंदाचा कल्क करून त्यांत चौपट तेल व तेलाइतकाच निर्गुडीचा रस घालून तेल सिद्ध करून त्याचें नस्य करावें; व लेपही करावा. ( ३ ) **व्रण, गंडमाळा, काळपुळी व बद यांवर**—कळलावीचा कांदा उगाळून लावावा. ( ४ ) **सूज, गांठ वगैरेवर**—कळलावीचा कांदा वाटून घालावा. ( ५ ) **सुखप्रसव होण्यास**—कळलावीचा कांदा पाण्यांत उगाळून, आपले हातास लेप करून, ज्या स्त्रीस कष्ट पडले असतील तिचे हातास आपले हाताचा स्पर्श करावा; म्हणजे सत्वर ती प्रसूत होते. अथवा कळलावीचे कंदास तंतु बांधून तो तिचे हातापायांस बांधावा. ( ६ ) **गुरांचें अंग बाहेर येतें त्यास**—कळलावीचा पाला हातास चोळून त्या अंगाजवळ दोन्ही हात न्यावे म्हणजे अंग आंत जातें. न जाईल तर त्या अंगास हाताचा स्पर्श करावा; व दोन्ही हात तोंडापुढें नेऊन दाखवावे; म्हणजे अंग आंत स्थिर रहातें. पुनः बाहेर येत नाहीं.

( ७ ) **कावीळीवर**—कळलावीच्या पाल्याचें चूर्ण ताकाशीं द्यावें. ( ८ ) **योनिशूळ व पुष्पावरोधावर**—कळलावी, आघाडा, किंवा वृंदावन यांचें मूळ योनीमध्यें धारण करावें. ( ९ ) **कृमिकर्ण म्हणजे कानांत कृमि होतात त्यावर**—कळलावीचा कांदा वाटून त्याचा रस कानांत घालावा. ( १० ) **सर्पदंशावर**—कळलावीचा कंद पाण्यांत वाटून त्याचें नस्य द्यावें. ( ११ ) **इसबावर**—कळलावीचा व कडवीचा कंद उगाळून ४।५ दिवस लावावा.

## ३० कंकोळ.

[ सं. कंकोळ. गु. कंकोळ. हिं. सीतला, चिनी. ]

कंकोळास ' कापुरचिनी ' ' कबाबचिनी ' असेंही म्हणतात. कंको-

ळाचे वेल असतात. हे माल्यपर्वत व चीन देशांत होतात. कंकोळ हें फळ मिऱ्यासारखें असतें. कंकोळ हें फळ सुगंधी असून फार थंड आहे. याचा औषधांत व सुगंधी पदार्थांत बराच उपयोग होतो.

**कंकोळ**—तिखट, कडू, उष्ण, दीपन, पाचन, रुचिकर, हृद्य, सुगंधी, लघु, कफनाशक; व मुखजाड्य, वातरोग, हृद्रोग, कृमि, अंधत्व, मुखदुर्गंधि, आम, अग्निमांद्य यांचा नाश करितो. ( १ ) **मुखरोगावर**--कंकोळ व खडीसाखर दाढेखाली धरून रस गिळीत जावा. ( २ ) **प्रमेहावर**–कंकोळाचें चूर्ण करून तें साखरेबरोबर द्यावें. ( ३ ) **रक्तष्ठीवी सन्निपात**—म्हणजे ज्या सन्निपातांत रक्ताच्या उलट्या होतात त्यावर—कंकोळाच्या चूर्णाचें नस्य द्यावें. ( ४ ) **प्रमेह व आगंतुक गर्मीवर**—कंकोळ अर्धा तोळा घेऊन साधारण कुटून अष्टमांश काढा करावा. त्यांत उत्तम चंदनी तेल सहापासून बारा थेंबपर्यंत घालावें व काढा निववून प्यावा. या योगानें लघवी साफ होते, व चंदनी तेल आंतील जखमेवर बसून दोन चार दिवसांत जखम भरून गुण येतो. हें औषध प्रत्यहीं प्रातःकाळीं, दोनप्रहरीं भोजनोत्तर व सायंकाळीं याप्रमाणें सतत ५ दिवस घेऊन फक्त गव्हाची पोळी, तूप–साखर इतकेच पदार्थ खावे; म्हणजे त्वरित गुण येतो. ( ५ ) **संग्रहणीवर**—कंकोळ एक तोळा, वेलदोडे एक तोळा व सोनकाव १ तोळा यांचें चूर्ण करून कापशीच्या पाल्याच्या रसांत तें खलून बोराएवढ्या गोळ्या करून सकाळीं व सायंकाळीं एकेक गोळी घेत जावी. ( ६ ) **मुखमाधुर्यावर**—कंकोळ, कापूर व मिरें साधारण चावून दाढेंत धरावीं व त्यापासून उत्पन्न होणारा द्रव थुंकीत रहावें. ( ७ ) **उन्हाळ्यावर**—कंकोळाचा काढा करून त्यांत ५ थेंबपर्यंत चंदनी तेल घालून द्यावें.

## ३० कांकड ( कर्कटक ).

कांकडाचा वृक्ष मोठा असून त्याचीं पानें साधारण मोठीं आणि लांबट असतात. कांकड हें फळ आंवळ्याएवढें दिसतें; परंतु त्यांत दोन तीन लहान बिया असतात. हीं फळें ज्येष्ठाच्या सुमारास येतात. तीं रुचकर

असून पित्तशामक आहेत. त्यांचें लोणचें चांगलें होतें. हीं फळें जून झालीं असतां उपयोगीं येत नाहींत.

**थोर कांकडाचें फळ**—तुरट, अग्निदीपक, आंबट, शीतळ, लघु, उष्ण, नेत्रांला हितकारक, रक्तपित्त व कफ करणारें व वातनाशक आहे. तेंच पिकलें असतां शीतळ, रुचिकारक व जड आहे; हें पित्त, रक्तदोष व कफ यांचा नाश करितें. **लहान कांकडाचें फळ**—ग्राहक, आंबट, पित्तल, अग्निदीपक, उष्ण व लघु आहे; तें पिकलें असतां मधुर, स्निग्ध, तुरट, वातनाशक व कफपित्तकारक आहे. ( १ ) **व्रणावर**—कांकडाचे झाडाची साल वाटून लावावी. ( २ ) **डोळ्यांतील फूल झडण्यास**—कांकडाचे झाडाचा हातभर लांबीचा बारीकसा तुकडा तोडून तोंडांत धरून फुंक मारावी, व त्यांतून जो रस निघेल तो तीन दिवस डोळ्यांत घालावा. ( ३ ) **प्रमेहावर**—कांकडाच्या पाल्याचा रस जिरें व खडीसाखर यांशीं द्यावा.

## ३२ कांकडी ( सं. कर्कट. )

कांकडीचा वेल असतो. खिरा, कांकडी, वाळूक, तवसें, इ. फळें एका जातीचीं आहेत; त्यांत थोडा फेर असतो. सर्वांत कांकडी चांगली लागते. कांकडींत साधी, सातपानी, टरकांकडी, तवसें व नारंगी अशा जाती आहेत. कांकडीची भाजी, कोशिंबीर व सांडगे करितात. कांकडी सोलून उभी चिरून त्यांत मिरपूड व मीठ घालून कांहीं वेळ चोळून, त्यांतील पाणी वाहून जातें तें गेल्यावर, खाण्यास चांगली लागते. कांकडी थंड आहे. फार खाल्ली असतां ती बाधते. भिजवून मळलेल्या कणकींत कांकडीचें पाणी पडलें असतां त्या कणकींतील चिकटपणा नाहींसा होतो, हा एक मोठा चमत्कार आहे.

**कांकडी**—मधुर, शीत, रुचिकर, लघु, मूत्रल, सालीच्या ठायीं तिखट, कडू, पाचक, अग्निदीपक, अवृष्य व ग्राहिणी असून मूत्ररोध, अश्मरी, मूत्रकृच्छ्र, कृमि, दाह आणि श्रम यांचा नाश करिते. ही पिकली असतां रक्तदोषकर, उष्ण व बलकर आहे.

[ १ ] **मूत्राघातावर**—कांकडीचें बीं १ तोळा पावशेर पाण्यांत

टाकून द्यावें. अथवा कांकडीचें बीं, जिरें व साखर हीं पाण्यांत टाकून द्यावीं. (२) **गुडघी व मांड झाल्यास त्यांवर**--कांकडी ठेंचून ऊन करून बांधावी, किंवा कांकडीची जाड साल बांधावी व वरून कपड्याचें वेष्टण द्यावें. ह्याप्रमाणें २।३ दिवस करावें. (३) **मद्यावर उतार**—कांकडी खावी, म्हणजे मद्याचा मद उतरतो. (४) **मूतखड्यावर**—कांकडीचें बीं व पारव्याची विष्ठा हीं तांदुळाचे धुणांत वाटून द्यावीं. (५) **गलगंडावर**--जुन्या कांकडीच्या रसांत बिडलोण व सैंधव घालून नस्य करावें. (६) **पांढऱ्या धुपणीवर**-कांकडीच्या बियांतील मगज एक तोळा व पांढऱ्या कमळाच्या पाकळ्या एक तोळा घेऊन त्यांत जिरें व खडीसाखरेची पूड टाकून तें सात दिवस द्यावें. (७) **उन्हाळ्यांवर**-कांकडी चिरून तींत खडीसाखरेची पूड व निंबाचा रस घालून ती खावी. (८) **मूत्रकृच्छ्रावर**--कांकडीच्या बिया सोलून त्यांतील मगज आणि ज्येष्ठमध व दारुहळद यांचें चूर्ण हें एकत्र करून तें तांदुळाच्या धुवणांत द्यावें. (९) **मूत्ररेचनास**—अच्छेर दुधांत पाणी मिश्र करून, कांकडीचें बीं पाव तोळा व सोरमीठ दीड मासा हीं एकत्र बारीक वाटून कालवावीं. आणि उभ्यानें एकदम प्यावें व फिरत रहावें. याच्यायोगानें मूत्राशयांतील गर्मी झडून जाते व प्रमेह वगैरे विकार दूर होतात. (१०) **मूत्रकृच्छ्रावर**—कांकडीचें बीं, गुलाबकळी व पांढऱ्या कमळाच्या पाकळ्या एकत्र वाटून वस्त्रगाळ पाणी करून घ्यावें व त्यांत साखर घालून पिण्यास द्यावें. (११) **शीतज्वरावर**—कांकडी खाऊन वर आंबट ताक प्यावें, आणि शेक घ्यावा, किंवा पांघरूण घेऊन उन्हांत बसावें; म्हणजे सर्वांगाला घाम येऊन शीतज्वर नाश पावतो.

## ३३ काकडशिंगी.

(गु. काकडशिंगी. हिं. काकडाशृंगी. सं. कर्कटशृंगी.)

काकडशिंगीचे वृक्ष हिमालय पर्वतावर होतात. या वृक्षांच्या डाहळ्यांस कीटकाच्या कृतीनें उत्पन्न झालेला रस जमून त्याची फलाकृति ग्रंथि होते; तीस ' काकडशिंगी ' असें म्हणतात.

**कांकडशिंगी**–ही कडू, उष्ण, तुरट व जड आहे; ही वायु, उचकी, व अतिसार यांचा नाश करणारी, बालकांस हितकारक; व दमा, खोकला, रक्तदोष, पित्त, ज्वर, कफक्षय, वायु, हिध्मा, ऊर्ध्ववात, कृमि, तृष्णा, क्षतक्षय व अरुचि यांचा नाश करिते. ( १ ) **शृंग्यादि चूर्ण–बालकाचा खोकला, ज्वर व वांति यांवर**–कांकडशिंगी, नागरमोथे व अतिविष यांचें चूर्ण मधाशीं द्यावें. ( २ ) **बालकाचे खोकल्यावर**–कांकडशिंगी व मुळ्यांचें बीज यांचें चूर्ण, तूप व मध यांशीं द्यावें. ( ३ ) **अतिसारावर**—कांकडशिंगीचें चूर्ण मासा दीडमासा, मधांतून द्यावें.

## ३४ कांग धान्य ( सं. कंगु. )

हें धान्य एक प्रकारानें वरीसारखें आहे खरें; तथापि यांत पुष्कळ तफावत आहे. वरीच्या वरची साल फार पातळ असते, आणि रंग पिंवळट असतो; परंतु कांगाची साल जाड असून तांबूस, पिंवळट, काळसर अशा तीन चार प्रकारच्या रंगांची असते. त्याचे भात, पेज इ० पदार्थ करितात. लाह्या व पीठ करावयाचें असलें तर ते सडल्यावांचून भाजले पाहिजेत. कांगाचें रोप दोन अडीच हात उंच होऊन त्यास जें कणीस येतें तें बाजरीच्या कणसाप्रमाणें लांब व बारीक असतें. हा वरीपेक्षां कांगांत मुख्य भेद आहे. कांगाच्या पात्या अरुंद असतात.

**कांग**—शीतल, वातकारक, रूक्ष, वृष्य, तुरट, धातुवर्धक, स्वादु, गुरु, घोड्याला हितावह; व कफ, पित्त यांचा नाश करितात. हे कृष्ण, रक्त, अच्छ व पीत या भेदानें चार प्रकारचे, व गुणांनीं एकाहून एक अधिक आहेत. ( १ ) **अन्नद्रवशूलावर**–कांगाचे तांदुळाची खीर खावी.

## ३५ कांगोणी ( गु. कामोणी. सं. कागांगी. )

हीं झाडें पर्जन्यकाळीं उगवतात. हीं सुमारें दोन हात उंच वाढतात. यांस लाल व गुंजेएवढीं बारीक फळें येतात. तीं मुलें आवडीनें खातात. याच्या पानांच्या रसानें कागदावर लिहिलेलें अक्षर हिरव्या रंगाच्या शाईप्रमाणें दिसतें.

( १ ) **नाळगुदावर**—याच्या पानांचा रस लावावा, म्हणजे नाळ-

गुदाची सूज उतरते. ( २ ) पित्तावर—याच्या पानांची भाजी करून खावी; म्हणजे पित्त शमन होतें. ( ३ ) अफूवर—पानांचा रस काढून पाजावा. ( ४ ) **कानांत किडे वगैरे गेल्यास**—पानांचा रस पिळावा.

### ३६ कांग ( सं. काकजंघा. )

हिचीं पानें आघाडयाचे पानांसारखीं असतात. झाडही तेवढेंच म्हणजे कंबरेइतकें उंच असतें. कांगेचीं पानें फार मृदु असतात. कांगेस देशावर ' घावकाडी ' असेंही म्हणतात.

**कांग**—तुरट, तिखट, उष्ण, कडू व बलकर आहे; ही कफ, व्रण, कृमि, बधिरता, विषमज्वर, अजीर्ण, रक्तपित्त, ज्वर, कंडू, कुष्ठ, विष व पित्त यांचा नाश करिते. ( १ ) **व्रणावर**—कांगेचा पाला जाळून तुपांत अथवा तेलांत खलून लावावा. ( २ ) **कानांत कीड गेल्यास**—कांगेचा रस पिळावा. ( ३ ) **घोड्यास नाळ पडते त्यास**—कांगेचा पाला जाळून तेलांत खलून त्याची पट्टी लावावी. ( ४ ) **कर्णनाद व बहिरे-पणावर**—कांगेचा रस कानांत घालावा. ( ५ ) **खवड्यांस, गजकर्णास व नायट्यास**—कांगेचे झाडाची राख तेलांत खलून लावावी. ( ६ ) **निद्रा येण्यास**—कांगेचें मूळ मस्तकावर धारण करावें.( ७ ) **श्वेतप्रदरावर**—कांगेच्या मुळांचा रस, लोध्रचूर्ण व मध घालून द्यावा.

### ३७ कांचन ( गु. कंचनार. हिं. कचनार. सं. कांचनार.)

हा वृक्ष बराच मोठा होतो. हा बहुतेक आपट्याप्रमाणेंच दिसतो. याचीं पानें आपट्याच्या पानांसारखीं असतात; परंतु आपट्याच्या पानां-हून मोठीं व पातळ असतात. यांत पांढरा, पिंवळा, व तांबडा अशा तीन जाती आहेत. याच्या फुलांस साधारण सुवास असतो. यास चपट्या शिकेकाईच्या सारख्या शेंगा येतात. याच्या लांकडाचा रंग तांबूस असतो. हें रंगाच्या कामीं उपयोगीं पडतें. हें लांकूड फार चिवट असतें. यामुळें याच्या काठ्या करितात.

**तांबडा कांचन**—शीतल, सारक, अग्निदीपक, तुरट व ग्राहक असा आहे; हा कफ, पित्त, व्रण, कृमि, गंडमाळा, रक्तपित्त, कुष्ठ, वायु, गुदभ्रंश

व रक्तपित्त यांचा नाश करितो. **याचें फूल**—शीतळ, तुरट, रुक्ष, ग्राहक, मधुर, लघु; व पित्तक्षय, प्रदर, खोकला व रक्तविकार यांचा नाश करितें. **श्वेत कांचन**—ग्राहक, तुरट, मधुर, रुचकर, रुक्ष असा आहे; व दमा, खोकला, पित्त, रक्तविकार, क्षत व प्रदर यांचा नाश करितो. **पीत कांचन**—ग्राहक, दीपन, व्रणरोपण व तुरट आहे; हा मूत्रकृच्छ्र, कफ व वायु यांचा नाश करितो. (१) **गंडमाळेवर**—कांचनाची साल तांदुळाच्या धुणांत उगाळून तें २ पासून ४ तोळेपर्यंत द्यावें; अथवा कांचनाच्या सालीच्या काढ्यांत सुंठीचें चूर्ण घालून ४२ दिवस द्यावें. (२) **कफापासून झालेल्या नारूवर**—कांचनाच्या सालीच्या कल्काचा लेप करावा.

(३) **दाहावर**—कांचनाच्या सालीचा रस, जिऱ्याचें चूर्ण व कापूर घालून द्यावा. (४) **गंडमाळा फुटण्यास**—कांचनीचें मूळ चित्रक, अडुळसा यांच्या पाण्यांत वाटून सात दिवस लेप केला असतां सर्व दोषांपासून झालेल्या गंडमाळा फुटतात. हा लेप फोडावरही करावा.

### ३८ काजरा [ कुचला. सं. कारस्कार, विषमुष्टि. ]

सह्याद्रिपर्वताच्या प्रदेशांत हे वृक्ष बहुत आहेत. या वृक्षांचीं फळें, पानें किंबहुना सर्व भाग विषयुक्त आहेत. याच्या पानावर एखादा पदार्थ खाल्ला असतां देखील विकार होतो. याच्या फळास " जहर कुचला " असेंही म्हणतात. असा हा विषारी वृक्ष निरर्थक आहे असें कोणी म्हणेल; परंतु या वृक्षापासूनही मनुष्यांस पुष्कळ उपयोग व्हावा असे यांत ईश्वरानें गुण ठेविले आहेत.

**काजरा**—मदकर, तुरट, ग्राहक, तिखट, कडू, लघु, उष्ण; व कुष्ठ, रक्तविकार, कंडु, कफ, वातरोग, व्रण, अर्श व ज्वर यांचा नाश करितो. **याचें हिरवें फळ**—ग्राहक, तुरट, वातकर, लघु व शीतळ आहे. **पिकलें फळ**—विष, गुरु, पाककाळीं मधुर, व कफ, वायु, प्रमेह, पित्त व रक्तविकार यांचा नाश करितें. (१) **जनावरांस कांहीं विषबाधा झाल्यास**—काजऱ्याची बी किंवा मुळी उगाळून लावावी; म्हणजे तो विकार दूर होतो. (२) **कुत्र्याचे विषावर**—काजऱ्याच्या बिया तुपांत

परतून, त्या रोज क्रमवृद्धीनें सेवन कराव्या; अथवा काजरा बी १ वाल नित्य खावी. ( ३ ) अंगांत वारा मारीत असल्यास त्यास—काजऱ्याची बी उगाळून लावावी. ( ४ ) उटाणूवर–काजऱ्याची बी व समुद्रफळ उगाळून वर लावावें. ( ५ ) नाळगुदावर–काजऱ्याच्या झाडावरील बाशिंगाचे काप काढून कुळथांत घालून काढा करून द्यावा.

( ६ ) घुशी, उंदीर कमी व्हावयास–कुचल्याच्या बियांचें चूर्ण करून तें पिठांत मिसळावें व तें पीठ उंदीर खातील अशा जागीं ठेवावें. हें पीठ फार विषारी आहे. ( ७ ) हिंवतापावर—कुचल्याच्या बिया करपूं न देतां तुपांत तळून काढाव्या, म्हणजे शुद्ध होतात. मग त्यांचें चूर्ण करून तें १।२ गुंजा घेऊन मधांतून द्यावें. ( ८ ) वाऴंतरोगावर—शुद्ध केलेल्या कुचल्याच्या बियांचें चूर्ण १।२ गुंजा मधांतून द्यावें. ( ९ ) नारूवर—कुचल्याची बी, अथवा कुचल्याची बी व सोमल हीं पाण्यांत उगाळून तीन दिवस लेप करीत जावा. ( १० ) शीतज्वर, आंव, शूळ व संग्रहणी यांवर—शुद्ध कुचला ३ भाग व लवंगा १ भाग यांचा आल्याच्या रसांत खल करून, गुंजप्रमाण गोळी करून ती मधांत द्यावी. ( ११ ) शूलावर—कुचल्याच्या बियांचें तेल पातळयंत्रानें पाडून तें विड्यास लावून खावें. ( १२ ) अजीर्णशूळ व मंदाग्नि यांवर—शुद्ध कुचल्याचें १ अगर २ गुंजभार चूर्ण मधांतून द्यावें.

### ३९ कांजळ.

हीं झाडें खाडींत व खाजण्यांत होतात. कांजळीचें झाड बहुतकरून इफळीसारखेंच असतें, परंतु तितकें चिकट व बळकट नसतें. हें फक्त सर्पणाच्या कामीं उपयोगीं पडतें. यास बकुळीच्या फुलासारखीं लहान व सुवासिक फुलें येतात.

### ४० काजू. ( सं. काजूतक; अग्निकृत्. )

हें झाड आफ्रिका खंडांत व हिंदुस्थानांत होतें. मलबार, गोमांतक व कर्नाटक येथें या झाडाची समृद्धि फार आहे. याची उंची सामान्य असते. हीं झाडें रानांत व डोंगरावर बहुतकरून असतात. यांत पांढरी

व तांबडी अशा दोन जाती आहेत. या झाडापासून वाटसरू लोकांस आराम मिळतो. तो असा कीं, हे लोक मार्ग चालून थकले म्हणजे दोन प्रहरीं या झाडाच्या छायेंत जाऊन बसतात, व त्याचीं फळें खाऊन आपली तहानभूक शमवितात. काजूचें फळ—मऊ असतें; त्याला पुढें बी असते, तिची साल कठीण असते. तिच्या आंत बिब्यासारखा चीक असतो, तो अंगास लागला असतां उफळतो. सालीच्या आंत जो गोळा असतो, त्यास काजूगोळा असें म्हणतात. हे गोळे स्वादिष्ट लागतात. परंतु फार खाल्ले असतां त्राजपासून विकृति होते. ज्या देशांत काजूचें झाड होत नाहीं तेथें ते गोळे विकावयास नेतात. काजूचीं पिकलेलीं फळें खावयास उपयोगीं पडतात. वाळलेल्या बिया साखरेच्या पाकांत घालून हालवाई यांची मिठाई करितात. काजूच्या बियांचा चीक तारवांच्या तळांस लावतात. तेणें करून त्यांस पाण्यापासून उपद्रव होत नाहीं. काजूचें पक्व फळ नळविकार नाशक आहे.

काजू तुरट, मधुर, उष्ण, लघु, धातुवर्धक आहे; व वायु, कफ, गुल्म, उदर, ज्वर, कृमि, व्रण, अग्निमांद्य, कुष्ठ, श्वेतकुष्ठ, संग्रहणी, अर्श व आनाह यांचा नाश करितो. (१) पायांस चिखल्या होतात त्यांस—काजूच्या बियांचा चीक लावावा. ( २ ) गुरांस लाग म्हणून एक प्रकारचा उपद्रव होतो; त्यामुळें पाय सुजून त्यांच्यानें चालवत नाहींसें होतें त्यावर—हाच चीक लावावा; म्हणजे गुण पडतो. ( ३ ) मण्यारीचे विषावर—काजूचे सालीचा रस, घेणाराच्या शक्तीप्रमाणें पावशेरपासून अर्धा शेरपर्यंत पोटांत देऊन त्याजवर दूर्वांचा रस द्यावा, म्हणजे विष उतरेल. फार व्याकुळ होईल तर तोच रस ताळवेस जिरवावा, व मग दांतखीळ उघडून पोटांत औषध द्यावें. (४ ) बद त्वरित फुटण्यास काजूचा गीर आणि कच्चें तिवराचें फळ हीं थंड पाण्यांत गंधाप्रमाणें एकत्र उगाळून लेप करावा. यानें गांठी फुटतात. ( ५ ) नळविकारावर—नित्य प्रातःकाळीं काजूची पिकलेलीं बोंडें डेंखाकडील भाग कापून मिरपूड व मीठ लावून तीन चार दिवस खावीं.

## ४१ कांडवेल ( सं. कांडवल्ली. )

कांडवेल ही वईनिवडुंगाप्रमाणें असून त्यापेक्षां फार बारीक असते. हिच्या वेली असतात. हीस लहान लहान पेरें असतात. कांडवेलींत त्रिधारी कांडवेल, चौधारी कांडवेल अशा जाती आहेत. कांडवेलीचा पुष्कळ विस्तार होतो. त्रिधारी कांडवेलीस " हाडसंधी " असें म्हणतात.

**कांडवेल साधारण**–तिखट, कडू, उष्ण, सारक व पित्तल अशी आहे; व गुल्मलता, दुष्ट व्रण, प्लीहा, उदर, अग्निमांद्य, शूल, वायु व मलस्तंभ यांचा नाश करिते. **चौधारी कांडवेल**–भूतोपद्रव, शूल यांची नाश कारक, अति उष्ण व आध्मान वायु, तिमिर, वातरक्त, अपस्मार, वातरोग यांचा नाश करिते. ( १ ) **अंगांत भिनलेल्या किंवा सर्व प्रकारच्या गर्मीवर**–कांडवेल फोपाट्यांत भाजून पिळून तिचा दोनपासून तीन तोळेपर्यंत रस काढावा; मग त्यांत तितकेंच गाईचें तूप घालून एक वेळ अथवा दोन वेळ हा रस ७ दिवस घ्यावा. पथ्य अळणी करावें. यानें चट्टे, कात्रे, स्राव इ० सर्व विकार त्वरित बरे होतात. ( २ ) **स्त्रियांच्या रजोदोषावर**–कांडवेल फोपाट्यांत भाजून दोन तोळे रस काढून त्यांत तितकेंच तूप, गोपीचंदनाची पूड एक तोळा, व खडीसाखरेची पूड एक तोळा घालून द्यावा.

## ४२ कांडोळ.

कांडोळीस ' सारडोळ ' असेंही म्हणतात. हा वृक्ष मोठा होतो. कांडोळीच्या झाडाचा वर्ण पांढरा सफेत असतो. कांडोळाचीं पानें मोठालीं असतात. याचीं फुलें लाल असतात. या झाडांस आंब्याप्रमाणें वसंतऋतूंत मोहोर येऊन फळें येतात. या वेळीं जुनी पालवी सर्व गळून गेलेली असते. फळांचा आकार बदामाएवढा असतो. हीं पोंचट असतात. हीं पक्क फळें गुळचट लागतात, म्हणून तीं कोणी कोणी खातात. जंगली लोक या फळांतील डाळिंब्याची आंबटी करून खातात. याच्या डाहळ्या मोगली एरंडाप्रमाणें पोंचट असतात. कांडोळीच्या मुळाचा रंग लाल असतो. हें मूळ थंड आहे. कांडोळीच्या झाडास सफेत डीक येतो; तो

उपयोगी आहे. त्यास कथल्या गोंद म्हणतात. हें झाड इमारतीच्या उपयोगी नाहीं. याच्या सालीवर करमणुकीसाठीं कोणी लिहितात. या सालीवर कांहीं मंत्र लिहून आगपेण जाण्यास तीं गळ्यांतही बांधतात. कांडोळीची फांदी ठेंचून त्यापासून वाखाप्रमाणें दोऱ्या काढतात.

( १ ) लहान मुलांस व मोठ्या मनुष्यांस मुबारकी रोग ( डब्यासारखा ) होतो त्यास—कांडोळीचें मूळ, पांगाऱ्याचें मूळ, हेदूचें मूळ, व उंबराचें मूळ हीं उगाळून द्यावीं. ( २ ) अतिसारावर–कांडोळीची साल उगाळून द्यावी. ( ३ ) परमा, गरमी, व धातुविकार यांवर—कांडोळीच्या सालीचा, पाणी घालून रस काढून तो साखर घालून द्यावा. अथवा कांडोळीचें मूळ उगाळून खडीसाखर घालून तें द्यावें. कांडोळीचा गोंदही धातुविकारावर द्यावा. ( ४ ) गरमी, प्रमेह व धुपणी यांवर–कथल्या गोंद रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं आंत खडीसाखर घालून द्यावा. ( ५ ) क्षीण व वायु यांवर–कांडोळीची साल पाण्यांत घालून तें पाणी उकळून त्यानें स्नान घालावें.

४३ कांटेधोत्रा ( गु. पीळो धंतुरो. सं. स्वर्णक्षीरी. )

यास पिंवळा धोत्रा, विलायती धोत्रा, विलायत असेंही म्हणतात. हें झाड सुमारें हात दोन हात उंच वाढतें. याच्या सर्वांगावर बारीक कांटे असतात. यास जें बीं येतें, तें बंदुकीच्या दारूप्रमाणें काळें असतें. हें कागदांत घालून उडविलें असतां दारूप्रमाणें तडतड वाजतें. हीं झाडें पडसर जमिनींत पुष्कळ होतात. हीं झाडें सर्वत्र प्रसिद्ध आहेत. यांच्या बियांचें तेल काढितात. याच्या मुळासही पिसोळ्याच्या मुळाप्रमाणें “ चोक ” म्हणतात. याचे गुण पिसोळ्याप्रमाणें आहेत.

( १ ) विंचवाच्या विषावर–कांटेधोत्र्याच्या मुळीची साल विड्यांतून खावी. ( २ ) सामान्य विषावर–कांटेधोत्र्याच्या मुळीची साल खावयास द्यावी. ( ३ ) हिंवावर–कांटेधोत्र्याच्या मुळीची साल विड्यांतून खावी. ( ४ ) गर्मीच्या चट्ट्यांस–कांटेधोत्र्याचे शेंडे खुडले असतां जो चीक निघतो तो लावावा; अगर मूळ उगाळून लावावें. ( ५ ) डोळ्यांत फूल

पडतें व सारा येतो त्यावर—कांटेघोत्र्याचा चीक डोळ्यांत घालावा. ( ६ ) डोळे आल्यास त्यास—कांटेघोत्र्याच्या फुलांचा व पानांचा रस अथवा चीक डोळ्यांत पिळावा. ( ७ ) रेच होण्यास—मुळाचें चूर्ण शक्तीप्रमाणें उष्णोदकांतून द्यावें. ( ८ ) प्रमेहावर—कांटेघोत्र्याच्या पाल्याचा रस दोन तोळेपर्यंत काढून त्यांत तितकेंच तूप घालून प्रत्यहीं एक वेळ प्रमाणें पांच दिवस द्यावा. ( ९ ) रक्तपितीवर—कांटेघोत्र्याच्या पानांचा रस गाईच्या दुधांतून द्यावा. सहा महिनेपर्यंत घेतला असतां व्याधि निखालस जातो. ( १० ) खरजेवर—कांटेघोत्र्याचें बीं जाळून तेलांत खलून लावावें.

## ४४ कांटेरी डांबा.

रानांत एक प्रकारचा पांढरा कांटेरी डांबा होतो; तो पांच सहा महिने टिकतो. याचें झाड अर्धपुरुष उंच होऊन त्याच्या अंगास कांटे असतात. त्याची भाजी करितात, परंतु तीस स्वाद अगदीं कमी असतो.

## ४५ कांटेशेवती. ( सं. भद्रतरणी. )

हीस ‘ पांढरी शेवती,’ ‘ गुलाब शेवती ’ व ‘ शेवती गुलाब ’ असेंही म्हणतात. हिच्या झाडास गुलाबाप्रमाणें कांटे असून हिचीं पानेंही गुलाबाच्या पानांप्रमाणेंच कात्रेदार असतात. हीस राखडीच्या आकाराचीं पांढऱ्या रंगाचीं सफेत फुलें येतात. हीं झाडें बगीच्यांतून लावितात. कांटेशेवतीचा पाक व गुलकंद करितात. तो पित्त आणि दाह शामक आहे.

**पांढरी कांटेशेवती**—सारक, शीतल, हृद्य, शुक्रकर, लघु, तुरट, स्वादु, सुरभि, ग्राहक, वर्ण्य, तिखट, कडू, रुचिकर, अग्निदीपक व त्रिदोष, मुखपाक, रक्तपित्त, कफ, पित्त, रक्तविकार व दाह यांचा नाश करिते.

**तांबडी कांटेशेवती**—रक्तविकृति, विंचवाचें विष व त्रिदोष यांचा नाश करिते. वरकड गुण पांढरीसारखेच आहेत.

## ४६ कांतरवेल.

हीस ‘ कातरी ’ असें म्हणतात. हिच्या वेली असतात. कातरवेलीचीं

पानें कातरनिर्गुडीच्या पानांसारखीं असतात. या वेली कुंपणावर फार असतात. कातरनिर्गुडीच्या पानांस जसा उग्रट वास येतो, तसा हिच्या पानांस येत नाहीं. ही गुणानें फार थंड आहे.

( १ ) **गर्मीवर**—कातरवेलीच्या मुळ्या कुटून, त्यांचें अदमासें ६ मासे चूर्ण जुन्या गुळांतून रोज दोन वेळां, असें ७ दिवस द्यावें.

**४७ कांदा.** ( गु. डुंगरी. हिं. पिआज. सं. कंदक, पलांडु. )

कांदा सर्वत्र प्रसिद्ध आहे. कांद्याचा रोपा हात सवाहात उंच वाढतो. तो सरळ असून त्याच्या पात्या बारीक नळ्यांसारख्या असतात. कांद्यास जें बीं येतें तें काळें असून बंदुकीच्या दारूप्रमाणें असतें. कांद्याच्या मधून जो देंठ निघतो त्यास नळा असें म्हणतात. हे कोंवळे असतां त्यांची भाजी करितात. कांद्यांत दोन जाती आहेत; पांढरा व तांबडा. पांढरा कांदा औषधांत जास्त उपयोगी आहे. कांद्यामध्यें अति पौष्टिकपणा आहे. याविषयीं एक म्हण आहे:—" कांदा आणि मर्दाचा बांधा." सर्व प्रकारच्या भाज्यांत कांदा घातला असतां त्यांस तो स्वाद आणतो.

**पांढरा कांदा**—बलकर, तिखट, वृष्य, गुरु, मधुर, रुचिकर, स्निग्ध, कफकर, धातुवर्धक, निद्राप्रद व दीपक असा आहे. हा क्षय, हृद्रोग, वांति, अरुचि, रक्तपित्त, वात, पित्त, कफार्श, वातार्श, घाम, सूज व रक्तदोष यांचा नाश करितो. **हिरवा कांदा**—( हरित्पलांडु ) याचे गुण पांढऱ्या कांद्याप्रमाणें आहेत. **तांबडा कांदा**—शीतल, वृष्य, स्निग्ध, अग्निदीपक, गुरु, तिखट, मधुर, किंचित् उष्ण, पित्तकर, वृष्य व बलकारक आहे; व कफ, वायु, सूज, अर्श व कृमि यांचा नाश करितो. कांद्याचें बीज वृष्य आहे; तें दांतांतील कृमि व प्रमेह यांचा नाश करितें.

( १ ) **मुलांच्या आंकडी रोगावर**—पांढरा कांदा फोडून हुंगावयास द्यावा. ( २ ) **उन्माद रोगावर**—पांढऱ्या कांद्याच्या रसाचें अंजन करावें. ( ३ ) **उन्हानें कपाळ उठलें तर त्यावर**—कांदा फोडून हुंगावा, व कपाळावर चंदनाच्या गंधांत कापूर उगाळून लेप करावा. ( ४ ) **नाकांतून रक्त पडतें त्यास**—कांद्याच्या रसाचें नस्य द्यावें. ( ५ ) **महा-**

मारीवर—दोन दोन तासांनीं कांद्याचा रस पाजावा. ( ६ ) **पटकीचा उपद्रव न बाधण्यास**—रात्रौ भोजनोत्तर कांद्याच्या रसांत चण्याबरोबर हिंग उगाळून, त्यांत बडीशेप १ मासा व धने १ मासा टाकून तें घ्यावें. ( ७ ) **मुलास मोडशी व जंत झाल्यास**–कांद्याचा रस पाजावा. ( ८ ) **विंचवाच्या दंशावर**—कांद्याचीं दोन शकलें करून वर चोळावीं. ( ९ ) **उन्हाची झळ न लागण्यास**—एक कांदा जवळ बाळगावा; म्हणजे झळ लागत नाहीं. ( १० ) **तंबाखू लागली तर**—कांद्याचा रस द्यावा. ( ११ ) **उष्णतेवर**—भाजलेला पांढरा कांदा, जिरें व खडीसाखर एकत्र वाटून त्यांत गाईचें तूप दोन तोळे घालून द्यावें. ( १२ ) **आम्लपित्तानें घशांत जळजळल्यास**—पांढरा कांदा बारीक चिरून सुमारें नवटांक अदमुऱ्या गोड दह्यांत कालवावा व त्यांत पिठीसाखर घालून द्यावा. ( १३ ) **वीर्यवृद्धीवर**—कांद्याचा रस व मध एकत्र करून घ्यावा. ( १४ ) **गांधीलमाशीच्या दंशावर**—कांद्याचा रस लावावा. ( १५ ) **मूल लौकर वाढण्यास**—कांदा आणि गूळ खात गेलें असतां मूल लौकर वाढतें. ( १६ ) **आंवरक्तास**—कांदा बारीक चिरून चार-पांच वेळ धुऊन टाकावा आणि तो गट्टेदार दह्याबरोबर खाण्यास द्यावा. ( १७ ) **अतिसारावर**—कांद्याच्या रसांत अफू मिळवून द्यावी. ( १८ ) **उन्हाळ्यांस**—कांदा चिरून धुवून दह्याबरोबर खावा; व त्याचाच काप अथवा कांदा भाजून बारीक वाटून त्यांत तूप घालून गोळा करून बेंबीवर बांधावा. नुसता कांदा खाल्ल्यानेंही उन्हाळे राहतात. ( १९ ) **डोळे खरूं लागल्यास**—कांद्याच्या रसांत खडीसाखर उगाळून रात्रीस डोळ्यांत घालावी. व रक्तचंदन उगाळून डोळ्यांवर लावावें. ( २० ) **पुरुषत्व गेलें असल्यास**—पांढऱ्या कांद्याचा रस, मध, आल्याचा रस व तूप एकत्र करून प्रातःकाळीं द्यावें. एकवीस दिवसांत पुरुषत्व येईल. ( २१ ) **जखमेस संताप होईल तर**—कांदा चिरून तुपांत तळून ऊन ऊन वर बांधावा. ( २२ ) **वीर्यवृद्धि होण्यास व उरःक्षतक्षयावर**—कांद्याचा रस ६ मासे, तूप ३ मासे व मध ३ मासे एकत्र करून दररोज दोन्ही सांज घेत

जावें. रात्रीं अर्धा शेर तापलेलें दुध साखर टाकून पीत जावें. याप्रमाणें महिना दोन महिने द्यावें. [ २३ ] **अपस्मारावर**—पांढऱ्या कांद्याचा रस नाकांत पिळावा. [ २४ ] **कामीणरोगावर**—पांढरा कांदा, गूळ व त्यांत थोडी हळद घालून सकाळीं अथवा निजावयाचे वेळीं खावा. [ २५ ] **पडशावर**—पांढरा कांदा कापून दोन्ही नाकपुड्यांनीं सडकून हुंगावा. [ २६ ] **मुलास तानेचा आजार होतो त्यास**—पांढरा कांदा भाजून बारीक वाटावा. त्यांत गाईचें तूप घालून वडी करून ताळूवर बसवून वर एरंडाचें ओलें पान बसवून फडक्याचें वेष्टन द्यावें. याप्रमाणें ३ दिवस करावें. प्रतिदिवशीं सायंकाळीं कांद्याची वडी काढून टाकून, डोकें स्वच्छ धुवावें व गाईचें तूप ताळूवर घालावें; आणि पांढऱ्या कांद्याचा रस काढून त्यांत थोडें जिरें व खडीसाखरेची पूड घालून तो पोटांत द्यावा. [ २७ ] **उन्हाची झळ लागते त्यास**—पांढरा कांदा एक भाजून घ्यावा; व दुसरा हिरवा घेऊन दोन्ही बारीक वाटून त्यांत जिऱ्याची पूड दोन मासे व खडीसाखर दोन तोळे याप्रमाणें मिश्र करून एक वेळ द्यावें. [ २८ ] **वळ, बद, गांठी वगैरे पिकण्यास**—कांदा भाजून कुटावा आणि त्यांत तूप व हळदीची पूड घालून पुनः गरम करून सोसवेल तितके गरम पोटीस बांधावें. हें सौम्य व उत्तम पोटीस आहे. [ २९ ] **डोळे येतात त्यास**—कांद्याचा रस डोळ्यांत घालावा. [ ३० ] **गुरांस शेंबारोग** ( गुरांच्या नाकांतून श्लेष्मा पडूं लागतो तो ) **होतो त्यावर**—पांढरे कांदे सात व गूळ पावशेर याप्रमाणें प्रत्यहीं प्रातःकाळीं तीन दिवस खाऊं घालावें, व फार दिवसांचा जुना सरक्या काढलेला कापूस घेऊन स्वच्छ मोकळा करून, एका अग्रास अग्नि लावावा व त्यांतून निघणारा धूर त्या गुराच्या श्वासोच्छ्वासानें मस्तकांत जाऊं शकेल अशा बेतानें ती धुमती वात गुराच्या नाकापुढें धरावी. त्याप्रमाणें तीन दिवस करावें. [ ३१ ] **मूळव्याधीवर**—कांदे बारीक चिरून सावलीत वाळवावे. नंतर त्यांतील सुमारें १ तोळा सुकलेला कांदा तुपांत तळावा; मग त्यांत तिळाची पूड १ मासा व पिठीसाखर २ तोळे मिश्र करून नित्य सेवन करावें. [ ३२ ]

**पित्तविकारावर**—पांढरा कांदा बारीक चिरून गोड दह्यांत मिश्र करून त्यांत थोडी साखर घालून खावा. [ ३३ ] **दाढ दुखते त्यास**—कांद्याचें बीं चिलमेंत घालून ओढावें, अथवा नुसतेंच दाढेंत धरावें. [ ३४ ] **मूळव्याधीवर**—कांद्याचा रस साखर व तूप घालून द्यावा.

## ४८ कापशी [ गु. हिं. कपास. सं. कार्पासी. ]

कापशींत दोन प्रकार आहेत; देवकापशी व रानकापशी. बागांत किंवा घरीं लावितात तीस देवकापशी म्हणतात. हें झाड कित्येक वर्षेंपर्यंत वांचतें. शेतांत लावितात तीस रानकापशी म्हणतात. तिचें झाड वर्षायु असतें. रानकापशीचीं झाडें दोन तीन हात उंच वाढतात. देवकापशीचीं झाडें सुमारें पुरुष दीड पुरुष उंच वाढतात. देवकापशींतही दोन तीन प्रकार आहेत. एकीचें बीं रानकापशीप्रमाणेंच असतें; दुसरीचें बीं लांबट असून काळसर रंगाचें असतें. कापशीच्या झाडापासून कापूस उत्पन्न होतो. कापसाचा उपयोग सर्व जगास आहे. कापशीच्या बियांचें ( सरक्यांचें ] तेल काढतात.

**कापशी**–मधुर, शीतल, स्तन्यवर्धक, किंचित् उष्ण, बलकर, लघु व तुरट अशी आहे; व कफ, पित्त, तृषा, दाह, भ्रम, श्रम, वांति व मूर्च्छा यांचा नाश करिते. **कापशीचें बोंड**—मूत्रवर्धक; व वायु, रक्तविकार, कानांतील फोड, कर्णनाद व पूतिकर्ण यांचा नाश करितें. **सरक्या**–स्तन्यवर्धक, गुरु, वृष्य, कफकर व स्निग्ध आहेत. **कापूस**-किंचित् उष्ण, वातनाशक, लघु व मधुर असा आहे. ( १ ) **धुपणीवर**—कापशीच्या पाल्याचा रस द्यावा; अथवा कापशीचें मूळ तांदुळाचे धुणांत उगाळून दोन्ही वेळ द्यावें. ( २ ) **मोडशीवर**—देवकापशीचीं कोंवळीं बोंडें खावीं; म्हणजे दोन तीन दिवसांत मोडशी व ताप दूर होतात. ( ३ ) **सर्पदंशावर**–देवकपाशीच्या पानांचा रस काढून तो सुमारें ४।५ तोळे द्यावा व दंशावरही चोळावा; किंवा पिचकारीनें आंत घालवेल तर घालावा. ( ४ )**गंडमाळा व अपची**–( गंडमाळेचा भेद ) या रोगांवर रानकापशीच्या मुळांचें चूर्ण तांदुळांच्या पिठांत कालवून त्याची

भाकर करून रोगाचा नाश होईपावेतों रोज खावी.( ५ ) **स्तनांत दूध-येण्यास**—रानकापशीचें मूळ व उंसाचें मूळ एकत्र कांजींत वाटून द्यावें. [ ६ ] **स्तनरोगावर**—रानकापशीचें मूळ, व दुध्याभोपळा गव्हाच्या कांजींत वाटून लेप द्यावा. [ ७ ] **इंगळीच्या दंशावर**—कापशीचा पाला, बचनाग व मोहऱ्या यांचा लेप करावा; अथवा देवकापशीचें मूळ मनुष्याच्या मूत्रांत उगाळून दंशस्थानीं वाटून लेप करावा, किंवा कापशीचें लांकूड उगाळून लेप करावा. [ ८ ] **ज्वरानें अंगावर कंडू उठल्यास**—देवकापशीचे पाल्याचे रसांत कडू कारेलें वाटून अंगास लेप देऊन मर्दन करावें व नंतर चार घटकांनीं स्नान करावें. [ ९ ] **जखम भरण्यास**—पाचेच्या पाल्याचा अंगरस काढून त्यांत देवकापशीची मुळी उगाळून लावावी, अथवा देवकापशीच्या तुंवऱ्या व पाचेचीं पानें बारीक वाटून वडी करून जखमेवर बसवावी. यानें त्वरित जखम भरते. [ १० ] **विंचवाच्या विषावर**—कापशीचा पाला व मोहऱ्या एकत्र वाटून लेप द्यावा. किंवा कापशीचें मूळ रविवारीं काढून ठेवावें. तें चावून खाल्लें असतां विष उतरतें. [ ११ ] **अफूवर उतार**—कापशीच्या बियांचें चूर्ण व तुरटीचें चूर्ण एकत्र करून भक्षावें. [ १२ ] **लघवींत धातु [ खर ] पडते त्यास**—देवकापशीचीं दोन तीन पानें व खडीसाखर असें एकत्र करून प्रातःकाळीं खावें [ १३ ] **नाकातोंडांतून रक्त पडतें त्यास**—जुन्या कापसाची धुरी नाकांत द्यावी. नंतर २ तोळे कापशी रसांत १ तोळा खडीसाखर घालून तो रस पोटांत द्यावा. [ १४ ] **अफूवर**—देवकापशीच्या पाल्याचा रस द्यावा. [ १५ ] **स्त्रियांच्या नष्टपुष्पावर व विटाळ योग्य वेळी व बरोबर रीतीनें होत नसल्यास**—सरक्यांच्या तेलांत वेलदोडे, जिरें, हळद व सैंधव हीं एकेक मासा घेऊन बारीक वस्त्रामध्यें बांधून त्यांची पुरचुंडी चौथ्या दिवसापासून योनींत ठेवावी. [ १६ ] **कामीण रोगावर**—देवकापशीच्या बोंडाचा रस नाकांत घालावा. [ १७ ] **धोत्र्याच्या विषावर**—कापशीच्या बिया व फुलें यांचा काढा द्यावा. [ १८ ] **बालकाच्या अतिसारावर**—देवकापशीचीं ओलीं बोंडें

फोपाटचांत घालून त्यांस वाफ देऊन त्यांचा रस काढावा; व तो मुलास पाजावा. अथवा मुलाच्या आईनें बोंड चावून त्यांचा रस मुलाच्या तोंडांत घालावा. [ १९ ] **मगज शांत होण्यास व मस्तकशूळावर**–कापशीच्या बियांचें तेल मस्तकावर ३ अगर ७ दिवस चोळावें. [ २० ] **मूळव्याधीवर**—देवकापशीचे पाल्याचा रस गाईचे दुधांतून तीन तोळेपर्यंत द्यावा. [ २१ ] **आगंतुक ज्वरावर**–देवकापशीचा पाला गाईचे दुधांत वाटून ऊन करून अंगास लेप द्यावा.

## ४९ कापुरवेल.

या झाडास वेल ही संज्ञा आहे, परन्तु याचें झाड असतें. हें झाड तीन हात उंच वाढतें. याचें पान लांबट व चिंचोळें असतें. हें जवळ घेऊन पाहिलें असतां फार चमत्कारिक दिसतें. हें दिसण्यांत फार खरखरीत दिसतें, परन्तु हातास मऊ लागतें. यास बहुतेक कापराप्रमाणें वास येतो, म्हणून त्यास कापुरवेल असें नांव पडलें आहे. यासच कोणी कापूरचिनई असें म्हणतात. या झाडास कांहीं पांढऱ्या रंगाचे तुरे येतात. त्यांसही पानाप्रमाणें कांहींसा कापराचा वास येतो. हींच या झाडाचीं फुलें होत. हे तुरे अथवा त्याचीं पानें इतर फुलांच्या गुच्छांत घातलीं असतां त्यांत तऱ्हेतऱ्हेचे सर्व वास येतात.

[ १ ] **पोटदुखीवर**—कापूरवेलाच्या पानांचा रस काढून द्यावा.

## ५० कापूर. [ गु. कर्पूर. सं. कर्पूरवृक्ष. ]

कापराचे वृक्ष चीन देशांत व या देशांतही कोठें कोठें आहेत. कापूर दहा पांच प्रकारच्या झाडांपासून निघतो. हिंदुस्थानांत केळीच्या जातीचें एक झाड आहे, त्यापासून कापूर काढतात. त्या झाडास कापूरकेळ असें म्हणतात. कापूर करण्याची कृति निरनिराळ्या देशांत निरनिराळी आहे. कापुरांत तीन प्रकार आहेत; १ भीमसेनी म्ह० बरास कापूर, २ पत्री कापूर व ३ चिनई कापूर. कापूर वस्त्रांत व पुस्तकांत ठेवला असतां त्यास कसर लागत नाहीं. कापूर उघडा ठेवला असतां उडून जातो, सबब डब्यांत भरून ठेवला पाहिजे. कापूर सर्व ज्वरांवर चालतो, असें एका-

इंग्रजी वैद्यांचें मत आहे. कापुराच्या पाण्यांत झाडाचें बीं भिजवून ठेवलें असतां कितीही दिवसांनीं बाहेर काढलें, तरी तें जमिनींत घातल्या-बरोबर उगवतें.

**कापूर सर्वसाधारण**—मधुर, कडू, शीतळ, सुगंधी, लघु, नेत्र्य, लेखन, वृष्य, तिखट, प्रीतिकारक, मृदु व मदकारक असा आहे; व कफ, दाह, तृषा, रक्तपित्त, कंठरोग, नेत्ररोग, विष, पित्त, तोंडाची विरसता, दुर्गंध, उदर, मूत्रकृच्छ्र, प्रमेह व मलाचा गंध यांचा नाश करितो. हा ताजा असतां स्निग्ध, कडू, उष्ण, दाहकर आहे; व जुना झाला असतां दाह व शोष यांचा नाश करितो; तोच स्वच्छ केला असतां गुणांनीं अधिक होतो.

**भीमसेनी कापूर**—गोड, शीतळ, वृष्य, कडू व तिखट आहे; हा तृषा, दाह, रक्तपित्त व कफ यांचा नाश करितो. ( १ ) **विंचवाच्या विषावर**—विड्यांत चिंचोक्याइतका कापूर घालून खावा. ( २ ) **जना-वरांच्या क्षतांत किडे पडतात त्यास**—क्षतांत कापूर भरावा. ( ३ ) **इसबरोगावर**—कापूर एक तोळा, पांढरा कात एक तोळा व शेंदूर अर्धा तोळा हीं एकत्र खलून कांशाच्या ताटांत घालून त्यांत तूप दहा तोळे घालावें. त्याचें हातानें मर्दन करून, १२१ वेळां पाण्यानें धुवावें. हें मलम जखम, गर्मीचे चट्टे, खवडे, कानकुरकटी, भाजलेल्या ठिकाणीं, सड-लेल्या व नासलेल्या जखमेस उपयोगीं आहे; व ह्यानें इसब बरा होतो. ( ४ ) **बचनागाच्या विषावर**–कापूर पाण्यांत कालवून ध्यावा. ( ५ ) **पापणी झडली असल्यास तीवर**–निंबाच्या रसांत कापूर खलून लावावा. ( ६ ) **गर्मीच्या चट्टयांवर**–कापूर जाळून राहिलेला शेष तुपांत खलून लावावा. ( ७ ) **मेहरीवर**–कापुराचें तेल मेहरी आलेल्या जागीं लावावें. ( ८ ) **जंतांवर**—गुळांत किंचित् कापूर घालून मुलांस द्यावा. ( ९ ) **दांत दुखतात त्यास व दातांची कीड दूर होण्यास**–कापूर दाढेखालीं धरावा. ( १० ) **डोळ्यांत फूल पडल्यास**—कापूर वडाच्या चिकांत वाटून अंजन करावें. म्हणजे दोन महिन्याचें जरी फूल असलें तरी त्याचा

नाश होतो. (११) मूत्राघातावर—कापुराच्या चूर्णाची फडक्यांत वात करून हळुहळु शिश्नद्वारांत चालवावी आणि ठेवावी, म्हणजे मूत्राघाताचा नाश होतो. (१२) दुखावलेल्या भागाच्या वेदना शमन होण्यास, कापुराचें तेल—कापूर खलांत घालून बारीक होईपर्यंत घोटावा व त्यांत चौपट तेल घालून पुनः घोटावा, म्हणजे सर्व कापूर विरघळतो. हें तयार झालेलें तेल थोडा वेळ चोळून लावावें. [ १३ ] नारूवर—कापूर तुपांतून खावयास द्यावा.

## ५१ कापूरभेंडी.

कापूरभेंडीचीं झाडें डोंगराळ प्रदेशांत होतात. झाडाचीं उंची सुमारें पुरुष दोन पुरुष असते. कापूरभेंडीचीं पानें देवकापशीच्या पानांसारखीं असतात. हिचीं फुलें पांढऱ्या रंगाचीं असतात. कापूरभेंडीचीं झाडें बहुतकरून डोंगराच्या कड्यांवर अवघड जागीं असतात. कापूरभेंडीच्या मुळांस उत्तम प्रकारचा सुवास असतो. कापूरभेंडी अनेक रोगांवर चालते.

( १ ) सर्पदंशावर—कापूरभेंडीचें मूळ उगाळून अजमासें चार तोळे पोटांत द्यावें. ( २ ) आगंतुक जखमेवर—कापूरभेंडीचें मूळ उगाळून जखमेवर लावावें. म्हणजे जखमेचें शोधन होऊन जखम लवकर भरून येते. ( ३ ) भगंदरावर—कापूरभेंडीचें मूळ गंधाप्रमाणें उगाळून दिवसांतून चार पांच वेळां वर लावावें, व नित्य एक वेळ पोटांत घ्यावें. ( ४ ) व्रणावर—कापूरभेंडीचें मूळ थंड पाण्यांत उगाळून सहा मासे प्रमाणें दुवक्त पोटांत घ्यावें; व मुळावरील सालीचें चूर्ण चिलमींत घालून ओढावें व मुळाचा व्रणावर लेप करावा. ( ५ ) रक्तपित्तीवर—कापूरभेंडीचें मूळ १ तोळा थंड पाण्यांत उगाळून नित्य दुवक्त पोटांत घ्यावें. हें सहा महिने घ्यावें. ( ६ ) गंडमाळा व ग्रंथिरोग यांवर—कापूरभेंडीचें मूळ थंड पाण्यांत उगाळून नित्य लेप देत जावा.

## ५२ कॉफी. ( बुंद. )

अरबस्थान, हिंदुस्थान, हिंदी महासागरांतील बेटें व वेस्ट इंडीज बेटें

येथें हीं झाडें फार होतात. हें झाड तीन चार हात उंच वाढतें. अधिक वाढल्यास त्यास छाटून टाकतात. या झाडाचा रंग फार हिरवा असतो. आणि फुलतें तेव्हां या झाडाचीं फुलें पांढऱ्या चमेलीसारखीं असतात, व त्यांस मधुर वास येतो; परंतु तीं फार वेळ टिकत नाहींत. फुलें आल्या-नंतर आठ महिन्यांनीं कॉफीचीं फळें पिकून तयार होतात. हीं फळें कांहींशीं लांबोडीं असतात; व त्यांचा रंग, पिकलेपणीं तांबडा असतो. फळ पिकलें म्हणजे बुंद काढून वाळवितात. एकेका फळास बहुतकरून दोन दोन बुंद असतात, आणि एकएका झाडावर सुमारें शेर अच्छेर बुंद उत्पन्न होतात. यास कोणी कॉफी व कोणी कवा असें म्हणतात. अरब व मोंगल या लोकांत कॉफी घेण्याची चाल फार आहे. कॉफी तयार करण्याची कृति अशी आहे कीं, ती पहिल्यानें तुपांत भाजून कुटतात; नंतर ती चहाप्रमाणें तयार करून तींत दूध व साखर घालून पितात. कॉफीचा गुण असा आहे कीं, ती घेतली असतां अंगांतील सुस्ती व आळस जाऊन रक्तवृद्धि होते. जागरण झालें असतांही तिच्या योगानें अन्न पचन होऊन कांहीं उपद्रव होत नाहीं. हिंदु लोकांत अलीकडे कॉफी घेण्याचा फार परिपाठ पडला आहे. परंतु चहा आणि कॉफी हीं उष्ण असल्यामुळें या उष्ण हवेंत आपल्या लोकांस चहा, कॉफी नित्य घेणें कधींही हितकर होणार नाहीं. याजकरितां गरज लागल्यास कधीं कधीं कॉफीचें सेवन करावें; नित्य सेवन करूं नये.

### ५३ कारली ( गु. करेली. हिं. कारेली. सं. कारवेल्ल. )

कारलीचा वेल असतो. त्यास जीं फळें येतात त्यांस कारलीं म्हणतात. कारलें फार कडू असतें. याची भाजी मोठ्या प्रीतीनें लोक खातात. कारलें साधारणपक्षीं वीतभर लांब असतें. यांत पांढरें व हिरवें अशा दोन जाती आहेत. याची भाजी, कोशिंबीर, तळलेली भाजी इत्यादि पदार्थ करितात. कारल्यास ' कारेती ' असेंही म्हणतात.

लघु कारलें—अति कडू, अग्निदीपक, लघु, उष्ण, शीत, भेदक, स्वादु व पथ्यकर आहे; हें अरुचि, कफ, वायु, रक्तदोष, ज्वर, कृमि, पित्त

पांडु व कुष्ठ यांचा नाश करितें. **थोर कारलें**—तिखट, कडू, अग्निदीपक, अवृष्य, मेदक, रुचिकर, खारट, लघु, वातल व पित्तनाशक आहे. हें रक्तरोग, पांडु, अरुचि, कफ, श्वास, व्रण, कृमि, कोठरोग, कुष्ठ, ज्वर, प्रमेह, आध्मान व कामला यांचा नाश करितें. ( १ ) **पित्ताचा विकार झाल्यास**—-कारलीच्या पाल्याचा रस द्यावा, म्हणजे वमन होऊन पित्त पडेल. वमन न झाल्यास एक किंवा दोन रेच होऊन पित्ताचा नाश होतो. उतार तूपभात. ( २ ) **शीतपूर्वक कफपित्तज्वरावर**—कारलीच्या पानांचा रस जिरें घालून द्यावा. ( ३ ) **रातांधळ्यावर**—कारलीच्या पानांच्या रसांत मिरीं उगाळून त्याचें सायंकाळीं अंजन करावें. ३ दिवसांत गुण येतो. ( ४ ) **पारा अंगावर फुटला तर**-कारलीची मुळी पाण्यांत उगाळून द्यावी. ( ५ ) **मुलांस पोटांतलें होतें त्यावर**—-कारलीच्या पानांचा रस पैसाभार काढून त्यांत थोडीशी हळद टाकून तो पाजावा. म्हणजे उलटी व मलशुद्धि होऊन पोट साफ होईल. ( ६ ) **विषूची ( मोडशी ) रोगावर**—कारलीचा रस तिळाचे तेलाबरोबर द्यावा. ( ७ ) **रक्तार्शावर**-कारलीच्या पानांचा अथवा फळांचा रस लहान चमचाभर काढून साखरेशीं द्यावा. ( ८ ) **मूत्राघातावर**-कारलीच्या पाल्याचा रस नवटांक काढून त्यांत हिंग एक टांक घालून द्यावा. ( ९ ) **मुलांच्या पोटांतील डवा वगैरेवर**—कारलीचा पाला, अडुळशाचा पाला, पिकलेलीं विड्याचीं पानें व जांभळीची साल यांचा एकत्र रस काढून त्यांत वेखंड उगाळून सात दिवस पोटांत द्यावें. व पथ्य करावें. ( १० ) **जंतावर**—कारलीच्या पानांचा अथवा फळांचा रस द्यावा.

### ५४ कारवी. ( सं. करीर. )

हीं झाडें कोंकणांत सर्वत्र प्रसिद्ध आहेत. कारवी पांच सहा हात उंच सरळ वाढते. हिचा उपयोग कूड व ओमणांस होतो. कारवीच्या फुलांत मकरंद पुष्कळ असतो. मधमाशा तो नेऊन त्यांचा मध करितात.

( १ ) **बाळंतरोगावर**—कारवीचें बीं शेळीच्या मूत्रांतून सात दिवस उगाळून द्यावें.

## ५५ कारिंदा.

कारिंद्याचे वेल असतात. यास ' करांदा ' असेंहि म्हणतात. कारिंद्याचीं पानें किंचित् वाटोळीं असून कोनाच्या पानांपेक्षां दुपटीनें मोठीं असतात. याचा वेल माडाइतका उंच वाढतो. याची वाढ इतकी जलद आहे कीं, तो एका दिवसांत हात दीडहात वाढतो. या वेलास दीड दीड वितीच्या अंतरानें गांठी असतात; तेथें पानें येतात. त्या गांठीवर कोंब येऊन त्याचे फाटे पसरतात; त्या गांठीच्या खालच्या बाजूनें आऱ्या येऊन त्यांस लहान कारिंदे लागतात. ते वाढून सुमारें आंब्याएवढे मोठे होतात. वेल सुकली म्हणजे ते काढून घेतात, व जे जमिनींत लागलेले असतात तेही, मूळ खणून काढून घेतात. कारिंद्यांत गोडा व कडवा अशा दोन जाती आहेत. गोडयाची साल काळी असते, कडव्याची कोंवळेपणीं पांढरी असते; जून झाल्यावर त्यांत कांहीं फेर दिसत नाहीं. कडवे कारिंदे कोंकणांत रानांत पावसाळ्यांत आपोआप उत्पन्न होतात. गोडे कारिंदे भाजून अथवा त्यांची उसळ करून खातात. हे निराहारास उपयोगीं पडतात. याचे खीर, कीस, कापट्या असे पदार्थ करितात. यास रुचि चांगली असते. कडवे कारिंदे खाल्ले असतां त्यांपासून घेरी, वांति असे उपद्रव होतात; तथापि गरीब लोक ते आणून खातात. त्यापासून उपद्रव होऊं नये म्हणून अशी कृति करावी लागते कीं, ते सोलून त्यांच्या पातळ कापट्या कराव्या; त्यांस राख चोळून त्या पाण्यांत उकडाव्या; मग त्या एकदां स्वच्छ पाण्यांत धुवून उन्हांत सुकवाव्या. नंतर तेलांत तळून खाव्या. या तळलेल्या कापट्या पांढऱ्या शुभ्र परीटघडीसारख्या दिसतात.

[ १ ] मुखपाकावर—कारिंद्याचा वाळलेला पाला व कोहळ्याची वाळलेली साल यांचें धूम्रपान करावें. [ २ ] मूळव्याधीवर—कारिंदा भाजून वरील साल काढून टाकून आंतील मगजांत खडीसाखरेची पूड व गाईचें तूप हे दोन्ही पदार्थ कारिंद्याच्या मगजाचे दुप्पट घालून तिघेंही चांगलें मर्दन करून लहानशा आंब्याएवढी गोळी करून खावी. याप्रमाणें सतत

गुण येईपर्यंत औषध घ्यावें; म्हणजे रोग नाहींसा होऊन, धातुवृद्धि होऊन शरीर पुष्ट होतें. [ ३ ] **उपदंशावर**—कडू कारिंद्याचा, पांच वर्षांहून अधिक दिवसांचा जमिनींतील कंद खणून काढून त्याजवरील पाळें व काळी साल सोलून टाकावी. नंतर तो कंद किसून सावलींत वाळवून चूर्ण करून ठेवावें. हें चूर्ण प्रतिदिवशीं प्रातःकाळीं व सायंकाळीं गाईचें निरसें दूध पावशेर घेऊन त्यांत चार मासे घालावें आणि जिऱ्याची पूड चार गुंजा व खडीसाखरेची पूड दोन तोळे घालून तें द्यावें. [ ४ ] **पोटदुखी व अतिसार यांवर**—वर सांगितलेलें कडू कारिंद्याचें चूर्ण तुपांत कालवून गोळी करून द्यावें. [ ५ ] **रक्तातिसारावर**—कडू कारिंदा भाजून, सोलून बारीक वाटावा; आणि त्यांत जिऱ्याची पूड, पिठीसाखर व तूप घालून द्यावें.

## ५६ कारिवणा [ सं. लघुब्राह्मी.]

हें झाड वेलीप्रमाणें वाढतें. हीं झाडें मळेजमिनींत बाराही महिने असतात. हीं बागेंतून व घरींही कुंड्यांतून लावितात. कारिवण्याचीं पानें उंदराच्या कानाप्रमाणें असतात. हीं पानें दोन अंगुळें रुंदीचीं असतात. हीं झाडें कुंड्यांतून लावलीं असतां मुळास फूट फुटून यांचा बराच विस्तार होतो. याच्या पानांची चटणी करितात. ब्राह्मीप्रमाणें याचे गुण आहेत.

[ १ ] **भोंवळ येते त्यास**—कारिवण्याच्या पानांचा रस मस्तकास चोळावा. [ २ ] **लहान मुलाचा शब्दोच्चार स्पष्ट होण्यास**—नित्य प्रातःकाळीं कारिवण्याचीं ओलीं पानें खावयास द्यावीं; म्हणजे जिव्हेचें जडत्व कमी होऊन वर्णोच्चार स्पष्ट होऊं लागतो. [ ३ ] **पित्तापस्मारावर**—कारिवण्याच्या पानांचा रस व तूप एकत्र करून आटवून घृत सिद्ध करून तें घ्यावें. [ ४ ] **उष्णता व उन्हाळ्यावर**—कारिवण्याच्या पाल्याचा रस जिरें व खडीसाखर घालून द्यावा; व बेंबीवर कारिवण्याच्या रसांत फडकें भिजवून घडी घालावी. डोळ्यांत उष्णता असल्यास हा रस टाळवेवर चोळावा. [ ५ ] **उष्णतेनें मुलांच्या अंगावर ज्या गांठी येतात त्यांवर**—कारिवण्याचा रस व कळंबाचे सालीचा रस काढून त्यांत

गाईचें तूप व शंखजिरें घालून खल करून तें अंगास लावावें. ( ६ ) **सुजेवर**–कारिवण्याच्या पाल्याचा लेप करावा. ( ७ ) **मुलांच्या अतिसारावर**–कारिवण्याच्या पाल्याचा रस द्यावा. ( ८ ) **मुलांस तान्हेचा आजार झाल्यास**–कारिवण्याच्या पाल्याचा रस काढून त्यांत जिऱ्याची पूड व पिठीसाखर घालून द्यावी. ( ९ ) **उन्माद, चित्तभ्रम व अपस्मारावर**–कारिवण्याच्या पाल्याचा रस एक तोळा घेऊन त्यांत कोळिंजनाचें अथवा अकलकाऱ्याचें चूर्ण तीन मासे व तितकीच मध घालून प्रत्यहीं दुवक्त देत जावें. ही वनस्पति या रोगावर मोठी प्रशस्त आहे. ( १० ) **देवीच्या आजारावर**–कारिवण्याचा रस अथवा चाकवताचा रस मधाशीं द्यावा. ( ११ ) **ब्राह्मीघृत**–ब्राह्मीचा रस ४ शेर, तूप ४ शेर; वेखंड, कोष्ट व शंखपुष्पी या तिहींचें चूर्ण अर्धा शेर हीं एकत्र करून घृत सिद्ध करावें. हें सेवन केल्यापासून उपदंशानें झालेले संधिवात, विस्फोट, ग्रंथि इ० रोग व वातरक्त, उन्माद व अपस्मार हे दूर होतात. सदरहु रोगांवर या घृताचा वरही लेप करावा. तेणेंकरून कुष्ठ वगैरे रोगही दूर होतात, व मगज शांत होतो. ( १२ ) **स्वरभंगावर सारस्वत चूर्ण**—ब्राह्मी, वेखंड, हिरडे, अडुळसा व पिंपळी यांचें चूर्ण करून तें मधांत द्यावें.

### ५७ कारळें ( सं. कृष्णतिल. )

यास ‘ खुरासनी ’ असेंही म्हणतात. हें धान्य घाटावर फार पिकतें. कारळ्याचा रोपा सुमारें दीड दोन हात उंच वाढतो. यास पिवळ्या रंगाचीं फुलें येतात. ज्या वेळेस फुलें येतात त्या वेळीं कारळ्यांच्या शेताची दुरून फार चमत्कारिक शोभा दिसते. कारळ्यांचा रंग काळा असतो. याचें तेल काढतात. तें जाळावयास व खावयास उपयोगीं पडतें. त्याची पेंड गुरांस खावयास घालतात.

( १ ) **नेत्ररोगावर**—कारळ्याचें ताजें तेल प्रत्यहीं निजते वेळीं डोळ्यांत घालावें.

### ५८ कावळी पांढरी ( ते. हिंकवे. आ. सं. काकमाची. )

कावळीच्या वेली असतात. या वेलीचीं पानें त्रिदळ असून त्यांस

कात्रे असतात. वेलीचा रंग प्रथम तांबूस असून नंतर पांढरा होतो. या वेली बहुतेक प्रांतांत कुंपणावर असतात.

**कावली**—रसकाळीं उष्ण, कडू, तिखट, रसायन, वृष्य, स्निग्ध स्वर्य, हृद्य, धातुवर्धक, नेत्र्य, रुचिकर, सारक, लघु, अशी आहे; व कफ, शूल, अर्श, सूज, त्रिदोष, कुष्ठ, कंडू, कर्णकीट, अतिसार, उचकी, वांति, दमा, खोकला, ज्वर, हृद्रोग व मेह यांचा नाश करिते. ( १ ) **सुखप्रसव होण्यास**—कावळीचें मूळ कमरेस बांधावें. ( २ ) **प्रदरावर**—कावळीचें मूळ तांदुळाच्या धुणांत उगाळून द्यावें. ( ३ ) **आवाज सुटण्यास**—कावळी, पांढऱ्या गुंजेचा पाला, वेखंड व कोष्ट हीं समभाग घेऊन सुकवून चूर्ण करावें. या चूर्णांत थोडी पिंपळीची पूड घालून ते मधांत कालवून चिमण्या सुपारीएवढ्या गोळ्या कराव्या. ही गोळी तोंडांत धरून द्रव गिळावा. याच्या योगानें बसलेला आवाज सुटतो. ( ४ ) **वांतीवर**—कावळीची मुळी व हिंग एकत्र करून द्यावें. ( ५ ) **निद्रानाश दूर होण्यास**—कावळीचें मूळ सुतांत बांधून शेंडीस बांधावें म्हणजे निद्रा येते. ( ६ ) **आम्लपित्तावर**—कावळीच्या मुळांचा काढा अथवा स्वरस घेऊन, त्यांत थोडासा हिंग भाजून घालून द्यावा. ( ७ ) **धातुस्थानाच्या कडकीवर**—कावळीची मुळी थंड पाण्यांत किंवा गाईचे निरशा दुधांत उगाळून, त्यांत खडीसाखरेची पूड घालून शक्त्यनुरूप द्यावी. ( ८ ) **भूतज्वरावर**—पुष्यार्कीं थोर श्वेत कावळीचें मूळ आणावें व तें लाल सुतानें बाहु, गळा अथवा मस्तक यास बांधावें.

## ५९ कावळें.

हें गोमांतकाकडे कुंपणांत पुरुष दीड पुरुष उंच असें एक झाड होतें. त्यास चिंचेसारखीं पानें असून हिरव्या वाटाण्याएवढीं जांभळ्या रंगाची फळें त्यांत येतात. तीं मुलें खातात.

## ६० कासविंदा.

( गु. कासुंदरी. हिं. कसौंदी. सं. कासमर्द. )

हीं झाडें कंबरेइतकीं वाढतात. तरोड्याच्या झाडाच्या पानांहून

याचीं पानें बारीक असतात. यास पिंवळीं फुलें येतात, व शेंगा दाभणा-सारख्या जाड लांबट येतात. हीं झाडें कुंपणाच्या कडेस पुष्कळ उगवतात.

**कासविंदा**–तिखट, तुरट, मधुर, उष्ण, रुचिकर, पाचक, दीपक, कंठशुद्धिकर, ग्राही, लघु, रुक्ष असा आहे. हा कफ, पित्त, अजीर्ण, वायु, कास, विष, कृमि व विषूचि यांचा नाश करितो. **याचें पान**–पाककाळीं तिखट, वृष्य, उष्ण, लघु आहे; हें दमा, खोकला व अरुचि यांचा नाश करितें. **याचें फूल**–कास, श्वास व ऊर्ध्ववात यांचा नाश करितें.

(१) **गजकर्णावर**–कासविंद्याची मुळी उगाळून लावावी. अथवा पाल्याचा रस निंबाच्या रसांत घालून लावावा. (२) **उचकी व श्वास यांवर**–कासविंद्याच्या पानांचा काढा द्यावा. (३) **सुजेवर**–कासविंद्याचा पाला शेळीच्या दुधांत वाटून सुजेवर लावावा. (४) **पान्यास उतार**–कासविंद्याचे पाल्याचा रस काढून पाजावा. (५) **शीघ्रप्रसूतीवर**—कासविंद्याच्या पाल्याचा रस पोटांत द्यावा. (६) **गोमाशा वगैरे कानांत गेल्यास**–कासविंद्याचा रस कानांत पिळावा. (७) **दद्रु, किटिभ व कुष्ठ यांवर**—कासविंद्याचीं मुळें कांजींत वाटून लेप करावा. (८) **बिब्बा उततो त्यास**—कासविंद्याचा पाला वाटून लावावा.

## ६१ कासाळूं ( सं कासालु. ]

कासाळूस ' कासावत् ' असेंही म्हणतात. कासाळूंत काळें व पांढरें अशा दोन जाती आहेत. कासाळूंचीं पानें व देंठ्या हीं, अळवाचीं पानें व देंठ्या यांपेक्षां मोठीं असतात. कासाळूं हें गोड, पथ्यकारक, दीपक व रुचिप्रद आहे. हें कफ व वात यांचा नाश करितें.

(१) **काळपुळीस**—झाडावरील कांसाळूचा कांदा पाण्यांत उगाळून पुळीवर लेप करावा. पथ्य अळणी करावें. (२) **गळ्या वायु म्हणजे अंग आखडतें त्यावर**–काळ्या कासाळूंचा कांदा व बेदरीच्या वेलीचा कांदा हे दोन्ही एकत्र किसून त्या किसाच्या चार पोटल्या बांधाव्या व तापलेल्या तव्यावर त्या पोटल्या ऊन करून सोसवेल तितका शेक अंगास

द्यावा. ( ३ ) **संधिवायूस**—काळ्या कांसाळूची देंठी मंदाग्नींत भाजून तिचा रस ६ मासे गाईच्या दह्यांत घालून ऊन करून ७ दिवस द्यावा. यानें कफ व लाळ गळेल. उतार तूप भात. ( ४ ) **वद त्वरित फुटण्यास**—रानकांसाळूचा कांदा थंड पाण्यांत उगाळून त्याचा ठिपका द्यावा. तो सुकल्यास पुनः त्याच जागीं त्याच औषधाचा ठिपका द्यावा. याप्रमाणें तीन चार वेळां ठिपके द्यावे, म्हणजे छिद्र होऊन दर्द निघेल. ( ५ ) **उदररोगावर**—काळ्या कांसाळूचा कांदा १ तोळाप्रमाणें किसून नारळाचे रसांत घालून थोडे तांदुळ घालून शिजवून खीर करावी, व गूळ घालून द्यावी. ह्या औषधानें रोग फुटून मलमार्गानें रेच होऊन पडतो. एक किंवा दोन दिवस द्यावें. **उतार**—भाताचे पेजेंत तूप घालून द्यावें. तोंडास खाज सुटल्यास अमसुलाच्या अथवा चिंचेच्या पाण्याच्या चुळा भरून टाकाव्या. ६ ) **भ्रम व पित्तविकारावर**—काळ्या कांसाळूच्या देंठ्या फोपाट्यांत ाजून रस काढावा व पांच शेरपर्यंत नारळाचा रस काढून त्यांत अच्छेर र्यंत मालकांगोणीच्या बिया वाटून कालवाव्या; आणि सर्व एकत्र करून मंदाग्नीवर सर्व पाणी आटेपर्यंत कढवावें. म्हणजे तेल वर येतें. तें काढून घ्यावें. हें तेल, डोळे व मानेच्या शिरा इतक्या जागीं दिवसांतून दोन वेळां चोळून चोळून जिरवीत जावें. ( ७ ) **पांडुरोगावर**--समूळ कांसाळूं घेऊन त्याचें ६ मासे चूर्ण करून दुधांतून द्यावें. ( ८ ) **जलोदरावर**—कांसाळूचा कांदा १ तोळा ताकाशीं वाटून द्यावा. ( ९ ) **पडजिभेस**—कांसाळूच्या देंठीची राख लावावी. म्हणजे पडजीभ वर हटेल. ( १० ) **अनंतवात--शिरोरोगावर**—काळ्या कांसाळूचा कांदा किसून त्याच्या पोटल्या कराव्या, व तव्यावर गरम करून मस्तकास शेक द्यावा. नंतर कांहीं वेळां तोच कीस गरम करून त्याचा मस्तकावर पेंड बांधावा. ( ११ ) **सर्व वातविकारांवर**—कांसाळूचा कांदा १ तोळा किसून, रस काढून नारळाचा रस व दूध यांत त्याची खीर करून खावी; म्हणजे सर्व वात व उदरें नाश पावतात. ( १२ ) **जंतावर**—कांसाळूच्या कांद्याची २।४ गुंजा राख मधांत अथवा पाण्यांत द्यावी.

## ६२ काळी खजूर.

हा एक कडुनिंबाच्या जातीचा वृक्ष आहे. याचे वृक्ष सह्याद्रिपर्वतावर आहेत. याचीं पानें एक फूट लांबीचीं, दुभागलेलीं असतात. याचीं फुलें सफेत रंगाचीं असून उग्रगंधी असतात. काळी खजूर हें फळ खजूरीच्या आकाराचें असून फार कडू आहे.

( १ ) **पित्त पाडण्यास**—काळी खजूर उगाळून चाटण द्यावें. ( २ ) **ज्वराच्या योगानें जीभ चरचरीत झाल्यास त्यास व मुखपाकावर**—काळी खजूर उगाळून द्यावी.

## ६३ काळी वेल.

काळी वेल बहुधा कुंपणावर असते. हिच्या पानांचा आकार कांहींसा एरंडाच्या पानांसारखा असतो. हीं पानें एरंडाच्या पानांहून लांबट असतात.

( १ ) **कर्णमूळ, खवडे, स्तनरोग व रक्तवाऊ किंवा धावरें यांवर**—काळ्या वेलीची मुळी थंड पाण्यांत उगाळून लेप द्यावा. ( २ ) **फुरशाच्या विषावर**—काळ्या वेलीचीं कोंवळीं पानें व तांबड्या कुंभ्याची साल यांचा रस शक्तीप्रमाणें द्यावा. हें औषध तीन दिवस प्रत्यहीं दोन वेळां द्यावें. **उतार**—काळ्या तुळशीचा अगर तांबड्या अगस्त्याचा रस द्यावा. विषानें सूज आली असल्यास त्यावर काळ्या वेलीचा कांदा ठेंचून बांधावा. ( ३ ) **उवा मरण्यास**—काळ्या वेलीच्या पानांच्या रसांत कापूर घालून, खल करून, त्यांत पाणी घालून तें घोटून तें मिश्रण रात्रीं निजते वेळीं केंसांस लावावें. वर काळ्या वेलीचीं पानें बांधावीं; व वरून चौघडी वस्त्राचें वेष्टन द्यावें; म्हणजे दुसरे दिवशीं सकाळपर्यंत सर्व उवा मरतात.

## ६४ किंजळ.

किंजळीचा वृक्ष मोठा होतो. याचीं पानें लांबट असतात. किंजळीचें लांकूड इमारतीच्या कामास चांगलें उपयोगी पडतें. जादूटोणा वगैरे चालूं

नये म्हणून किंजळीच्या झाडाची काठी कोणी जवळ बाळगितात. हीस 'किंडळ' असेंही म्हणतात.

(१) **अफूवर उतार**–किंजळीच्या पानांचा रस द्यावा. (२) **पटकीवर**—किंजळीच्या पानांचा रस अजमासें पावशेरपर्यंत द्यावा. (३) **कर्णमूळावर**—किंजळीच्या पाल्याच्या रसांत म्हशीचें तूप घालून व त्यांत शेंदेलोण उगाळून, तें प्रति दिवशीं चार पांच वेळ कानांत घालावें. (४) **कर्णस्रावावर**—किंजळीच्या कोंवळ्या तुंवऱ्यांचा व सालीचा रस एकत्र करून कानांत घालावा. (५) **विसर्प व विस्फोट रोगावर**–किंजळीचे सालीचा रस काढून त्यांत कोंवळ्या दुर्वा आणि तांदूळ वाटून त्याचा वर लेप करावा.

## ६५ किन्हई [ सं. कटभी. ]

हें झाड मोठें होतें. याचीं पानें टाकळ्याच्या पानांसारखीं असतात. या झाडास चापट शेंगा येतात. झाडाचा वर्ण कांहींसा पांढुरका असतो.

**मोठी श्वेत किन्हई**—तिखट, उष्ण, तुरट व कडू अशी आहे. ही नाडीव्रण, रक्तदोष, प्रमेह, विष, कृमि, श्वेतकुष्ठ, कफ, त्रिदोष, व्रण, शिरोरोग व अजीर्ण यांचा नाश करिते. **हिचें फळ**—धातु व कफ यांना वाढविणारें आहे. **हिचा चीक**—गुरु, वृष्य, बल्य व वातनाशक आहे.

**लघु श्वेत किन्हई**—उष्ण व तिखट आहे; व कुष्ठ, कफ, रक्तदोष, मेदोरोग, नाडीव्रण, विष, मेह व कृमि यांचा नाश करिते.

**काळी किन्हई**–उष्ण व तिखट आहे; ही गुल्म व आध्मानशूल यांचा नाश करिते. वरकड गुण पांढरीसारखेच आहेत.

(१) **कंडू व गजकर्ण यांवर**–किन्हईचा पाला वाटून लावावा.

## ६६ किरमाणी ओंवा [ सं. चौर. ]

यास "चोरओंवा" असेंही म्हणतात. हा पार्शीया देशांत पिकतो. हें बीज अफगाणिस्तान व पर्शिया येथून हिंदुस्थानांत येतें. हें कडवट असतें. या ओंव्यांतून एक सत्व शोधून काढलें आहे; त्यास 'सँटोनाईन' असें इंग्रजी भाषेंत नांव आहे. हें एका रशियन वैद्यानें सन १८३०

साली शोधून काढलें. हें सत्व कृमींवर १।२।३ गुंजांपर्यंत साखरेशीं रात्रीं देतात व सकाळीं सुंठीचा काढा अथवा एरंडेल घ्यावयास सांगतात. सुंठीचा काढा घेतला नाहीं तर या औषधांचा प्रभाव कांहींच नजरेस येत नाहीं. यावरून हें औषध लंगडें असावें असें वाटतें. कारण; सुंठ ही यष्टि नसली कीं, हें औषध लंगड्याप्रमाणें होतें. सांप्रत या औषधाचें हिंदुस्थानांत फारच प्रस्थ वाढलें आहे. परंतु त्याच्या तोंडांत मारणारीं इकडे पुष्कळ औषधें आहेत असें शोधांतीं समजून येणारें आहे. आपल्या इकडे या जातीचें झाड–ज्यास साष्टी प्रांतांत ' मारवेटी ' अथवा ' सुरबंद ' म्हणतात तें आहे. त्याचें वर्णन पुढें केलेलें आहे.

**किरमाणी ओंवा**—कडू, उष्ण, तिखट, तीक्ष्ण, अग्निदीपक वृष्य व लघु आहे. हा त्रिदोष, अजीर्ण, कृमि, शूल व आम यांचा नाश करितो. बाकी गुण ओंव्याप्रमाणेंच आहेत. **कृमिरोगावर**—किरमाणी ओंवा प्रातःकाळीं शिळ्या पाण्यांत घ्यावा; अथवा विड्यांतून खावा; म्हणजे कृमिरोग ( जंतविकार ) दूर होतो.

## ६७ किराईत.

( गु. करियातुं. हिं. किराईत. सं. किराततिक्त, भूनिंब. )

यांत दोन जाती आहेत. एक काडेकिराईत व दुसरी पालेकिराईत. किराईताचीं झाडें लहान, हात दीड हात उंच असून, याचीं पानें लहानसर लांबट असतात. पालेकिराईत हें या देशांतील बागांतून होतें, काडेकिराईत हें नेपाळकडून कलकत्त्याच्या मार्गानें मुंबईस येतें. हें फार कडू आहे. यास ' चिराईत ' असेंही म्हणतात.

**किराईत**—वातल, कडू, व्रणरोपक, सारक, शीत, पथ्यकर, लघु, रूक्ष; व तृषा, कफ, पित्त, ज्वर, कुष्ठ, कंडू, सूज, कृमि, सन्निपातज्वर, दाह, शूल, मेह, व्रण, श्वास, कास, प्रदर, शोष, अर्श व अरुचि यांचा नाश करितें. नेपाळकिराईत—किंचित् उष्ण, योगवाहक, लघु, कडु, व पित्त, कफ, शोथ, रक्तरोग, तृषा व ज्वर यांचा नाश करितें. वरकड गुण किराईतासारखे आहेत. ( १ ) **आमवात, जीर्णज्वर व सर्व प्रकारच्या**

**गर्भाच्या रोगांवर**— रात्रीं तीन मासे चिराईतांत दोन तोळे पाणी घालून भिजत ठेवावें. सकाळीं वस्त्रगाळ करून, त्यांत दोन गुंजा कापूर, दोन गुंजा शिलाजित व अर्धा तोळा मध याप्रमाणें घालून दररोज सेवन केल्यानें सात दिवसांत गुण आल्यावांचून राहत नाहीं, व सर्व रोग नष्ट होऊन चांगली शक्ति येते. हें अनुभाविक आहे. ( २ ) **सर्वसाधारण ज्वरांवर**–किराईत, सुंठ व डिकेमाली यांचा **अष्टमांश** काढा करून ठेवावा. व सकाळीं, तिसऱ्या प्रहरीं व सायंकाळीं याप्रमाणें नित्य तीन वेळ घ्यावा. ( ३ ) **नळविकारावर व पोटदुखीवर**–किराईताचा ओला पाला बारीक वाटून त्याचा रस काढावा. त्यांत मिरपूड व सैंधव अथवा पादेलोण किंवा वडागरी मीठ व किंचित् हिंग घालून द्यावा. यानें अजीर्णही दूर होतें. ( ४ ) **कांपऱ्यावर** ( एखाद्यास दिवसांतून दहा पांच वेळ अंगांतून स्वभावतः शिरशिरी येते; याचें कारण अस्थिगत जीर्णज्वर आहे, त्यावर. ) काडेकिराईत, सुंठ, कुटकी, खारीक व कुड्याचे पाळावरील साल यांचा काढा करून त्यांत मध घालून द्यावा. ( ५ ) **आम्लपित्तावर**—किराईत व माका यांचा काढा करून त्यांत मध घालून द्यावा. ( ६ ) **हरताळाचे विषावर**–किराईताचा काढा द्यावा.

### ६८ कुटकी [ सं. कटुकी. गु. कडु. हिं. कटुकी. ]

कुटकीची उत्पत्ति हिमालय पर्वताच्या उतरणीवरील कामाऊन प्रांतांत विशेष होते. तिकडून या वनस्पतीचीं मुळें इकडे येतात. कुटकीस " बाळकडू " असेंही म्हणतात. कुटकी ही अतिशय कडू आहे.

**कुटकी**—शीतळ, तिखट, कडू, अग्निदीपक, भेदक, सारक व रूक्ष आहे; व रक्तरोग, शीत, पित्त, दमा, कफ, दाह, अरुचि, ज्वर, मेह, कुष्ठ, विषमज्वर, खोकला, क्षय, कावीळ, विष व हृद्रोग यांचा नाश करिते.

( १ ) **कामीणरोगावर**–कुटकीचा काढा करून मध घालून द्यावा, अथवा कुटकीचें चूर्ण साखरेंतून द्यावें. ( २ ) **एकाहिक विषमज्वरावर**–कुटकीचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा; म्हणजे तो खोकला व दमा यांनीं युक्त अशा एकाहिक ज्वराचा नाश करितो. ( ३ ) **उचकी व वांति**

यांवर—कुटकीचें चूर्ण मधाशीं द्यावें. ( ४ ) कफपित्तज्वरावर—कुट-कीचें चूर्ण साखर मिळवून उष्णोदकाशीं द्यावें.

६९ कुडा [ सं. कुटज. गु. इंदरजवनुं झाड. हिं. कोरैआ. ]

हीं रानझाडें आहेत. हें झाड सहा सात हातांपेक्षां उंच होत नाहीं. याचीं पानें बदामाच्या पानासारखीं लांबोडीं असतात. कोंकणांत या पानांचा फार खप होतो. याच्या फुलांची भाजी होते. याच्या शेंगा बारीक व लांब असतात; भाजीस व लोणच्यास त्या उपयोगीं पडतात. शेंगांतून जवाच्या आकृतीच्या लांबट बिया निघतात, त्यांस ‘ इंद्रजव ’ म्हणतात. त्या बिया कडू असतात. याचें मूळही कडू असतें. मुळांचा पाक होतो, त्यास कुडे-पाक म्हणतात. कुड्यांत पांढरा व काळा अशा दोन जाती आहेत.

**पांढरा कुडा**—कडू, तिखट, उष्ण, अग्निदीपक, पाचक, तुरट, रूक्ष, ग्राहक; व रक्तदोष, कुष्ठ, अतिसार, पित्तार्श, कफ, तृषा, कृमि, ज्वर, आंव व दाह यांचा नाश करितो. **काळा कुडा**—रक्तदोष, अर्शरोग, त्वग्दोष व पित्त यांचा नाश करितो. वरकड गुण पांढऱ्या कुड्यासारखेच आहेत. ( १ ) **कृमींवर**—कुडयाचें पाळ उगाळून नुसतें अथवा वावडिंगाची पूड घालून द्यावें. ( २ ) **अतिसारावर**—कुडयाच्या सालीचा अंगरस काढून तो द्यावा. अथवा सालीचा पुटपाकानें रस काढून तो मधाशीं द्यावा. ( ३ ) **मूतखड्यावर**—इंद्रजव व निशोत्तर यांचें चूर्ण दुधांत किंवा तांदुळांच्या धुवणाशीं द्यावें. ( ४ ) **फुरशाच्या विषावर**—काळ्या कुडयाचें पाळ उगाळून त्यांत इंद्रजवाचें चूर्ण अर्धा मासा घालून द्यावें, अथवा सालीचा रस काढून द्यावा. ( ५ ) **खवड्यांवर**—कुडेसाल व सैंधव गोमूत्रांत वाटून लावावें. ( ६ ) **काविळीस व सर्व विषांवर**—काळ्या कुडयाच्या अंकुरांचा चार पैसेभार रस ३ दिवस द्यावा. पथ्य—तूप भात अळणी. ( ७ ) **नळ फुगल्यास**—इंद्रजव भाजून त्याची पूड पैसाभार, मध पैसाभार व तूप पैसाभार हीं एकत्र करून ७ दिवस द्यावीं. ( ८ ) **जीर्णज्वरास**—कुडयाच्या मुळाची साल व गुळवेल यांचा काढा द्यावा. अथवा साल रात्रीं पाण्यांत भिजूं घालून सकाळीं तें पाणी द्यावें.

(९) **कान वहातो त्यास**-कुडच्याच्या सालीचें चूर्ण वस्त्रगाळ करून कानांत घालावें व वर मखमालीचे पाल्याचा रस पिळावा. (१०) **उन्हाळीवर**-कुडचाची साल गाईच्या दुधांत वाटून द्यावी. कठीण मूत्रकृच्छ्राचाही नाश होईल. (११) **परिणामशूलावर**- इंद्रजवाचें चूर्ण उष्णोदकाशीं द्यावें. (१२) **मुलांचे भसऱ्या हगवणीवर**--कुडच्याचें पाळ ताकाचे निवळींत उगाळून थोडा हिंग लावून पाजावें. (१३) **मुलांच्या मोडशीवर**- कुडचाचें मूळ व मोगली एरंडाचें मूळ ताकाचे निवळींत उगाळून थोडा हिंग घालून पाजावें. (१४) **वातशूलावर**-इंद्रजवाचा काढा करून त्यांत पादेलोण व भाजलेला हिंग द्यावा. (१५) **गुरांच्या कुंदरोगावर**—[गुरूं सुक्या लेंड्या हगतें त्यास] कुडच्याच्या कोंवळ्या तुंबऱ्या बारीक कुटून पावशेर रस काढावा. त्यांत तितकाच नारळाचा रस व नवटांक गूळ घालून सात दिवस प्रत्यहीं दुवक्त हें औषध द्यावें. (१६) **सर्व प्रकारचा अतिसार, संग्रहणी, पांडु व जीर्णज्वर यांवर-कुडेपाक**-कुडचाचीं मुळें धुवून त्यांची साल काढावी. व पाणी घालून कुटून तिचा रस काढावा व तो रस अग्नीवर ठेवून आटवीत रहावें. साधारण आटल्यावर त्यांत सुंठ, मिरें, पिंपळी, जायफळ, मायफळ, पत्री, लवंग, वावडिंग, मुरडशेंग, बाळवेलफळ व नागकेशर यांचें चूर्ण बेतानें घालून सारखें मिश्रण झाल्यावर हरबऱ्याएवढ्या गोळ्या कराव्या. ही गोळी अतिसार व संग्रहणीस ताकाचे निवळींत किंचित् हिंगाचें चूर्ण टाकून त्यांतून, गोड अदमुऱ्या दह्यांतून, सुंठीचे काढ्यांतून, अथवा तुपांतून द्यावी. लहान मुलांसही हें औषध गुणावह आहे. **पांडुरोगावर**—फक्त ही गोळी गोमूत्रांत उगाळून द्यावी. (१७) **वातज्वरावर**-कुडच्याच्या मुळाची साल १ तोळा घेऊन बारीक वाटावी. व ५ तोळे पाण्यांत कालवून तें पाणी वस्त्रगाळ करून घ्यावें; व त्यांत थोडा ओंवा बारीक वाटून कालवून कौलाचा तुकडा तापवून विझवावा, आणि तें घ्यावें. (१८) **नाळगुदावर**-वारुळांतील कुड्याचें मूळ घेऊन तें ऊन पाण्यांत उगाळून प्रत्यहीं दोन वेळ प्रमाणें चौदा अगर एकवीस दिवस घ्यावें. (१९) **सर्वा-**

**अतिसारावर**—कुड्याचे सालीचा काढा अष्टमांश करून त्यांत अतिविषाची पूड घालून तो घ्यावा; अथवा कुडयाचे मुळाची साल व अतिविष यांचें चूर्ण मधाशीं द्यावें. ( २० ) **मूतखड्यावर**–कुडयाची साल दह्यांत उगाळून प्यावी. ( २१ ) **कुटजाष्टकावलेह**–कुडयाच्या मुळाची साल ओली, वजन ९ शेर व पाणी १६ शेर घेऊन काढा करावा. अष्टमांश उरला म्हणजे वस्त्रानें गाळून पुन्हा आटवावा. दाट झाला म्हणजे त्यांत औषधें घालावयाचीं तीं:–पहाडमूळ, कांटेसांवरीचा डिंक, धायटीचें फूल, नागरमोथे, अतिविष, लाजाळू व बाळवेल यांचें चूर्ण चार चार तोळे त्यांत घालून तो अवलेह तयार करावा. तो पाणी, गाईचें दूध, शेळीचें दूध व भाताची पेज, यांतून एखाद्या अनुपानाशीं दिला असतां अतिसार, संग्रहणी, रक्तप्रदर, रक्तपित्त, मूळव्याधीचें रक्त हीं बंद करितो. ( २२ ) **वातगुल्म, वायु, क्षय, कंडू व ज्वर यांवर**—कुडयाच्या मुळांची साल आणून तिचा पुटपाकानें रस काढून तो घ्यावा.

### ७० कुंद.

कुंदाचे वेल असतात. हे वेल चमेलीच्या वेलांसारखे होतात. यांस आश्विन-कार्तिकांत फुलें येऊं लागतात. हें फूल रानमोगरीप्रमाणें असतें. हें किंचित लांबट असतें. याला चैत्र वैशाखांत फार भर येतो. यास बराच वास येतो. परंतु तो जरा उग्रट असतो.

### ७१ कुंभा ( गु. कायफळ. सं. कुंभी, कुमुदिका. )

कुंभ्याचीं झाडें कोंकणांत प्रसिद्ध आहेत. याचीं पानें लांबोडीं असतात. तीं पत्रावळीच्या उपयोगीं पडतात. याचें फळ—बेलफळाप्रमाणें गोल होतें. यांत तांबडा व पांढरा अशा दोन जाती आहेत. याच्या सालीचे बंद चांगले होतात. तांबडा कुंभा औषधास अधिक उपयोगीं आहे. ह्याच्या सालीस ‘ कायफळ ’ असें म्हणतात.

**कुंभा**—तिखट, उष्ण, तुरट, ग्राहक असून वात, पित्त, ज्वर, दाह, कफ, रक्तातिसार, योनिदोष, विष व कृमि यांचा नाश करितो. ( १ ) **फुरशाच्या विषावर**—तांबडया कुंभ्याच्या सालीचा रस पावशेर व

थोडासा काळे वेलीचा रस पाण्यांत काढून हे दोन्ही एकत्र करून त्यांत मिरपूड घालून पोटांत द्यावें. उतार–काळ्या तुळशीचा रस पाजावा. (२) **खोकल्यावर**–कुंभ्याचे सालीचा रस व मध एकत्र करून सात दिवस द्यावा. (३) **उन्हाळ्यांस**–कुंभ्याच्या सालीचा रस साखर घालून द्यावा. (४) **दम्यास**—कुंभ्याच्या सालीच्या रसांत मोहरी वाटून द्यावी. (५) **धातुपरम्यास**—कुंभ्याचे सालीचा व नारळाचा रस एकत्र करून सात दिवस द्यावा. (६) **अंग भाजल्यास**––तांबड्या कुंभ्याच्या सालीचा रस वर लावावा. (७) **मोडशीवर**–कायफळ उगाळून द्यावें. (८) **अतिसारावर**–कुंभ्याच्या सालीचा काढा द्यावा. (९) **मस्तकशूलावर**–कायफळाची पूड ओढावी. (१०) **व्रणाचे शुद्धीस**–कुंभ्याच्या सालीचा काढा करून त्यानें व्रण धुवावा. (११) **दंतरोगावर**–कुंभ्याच्या सालीचा काढा करून त्याच्या गुळण्या कराव्या; म्हणजे दंतशूळ दूर होऊन दांत मजबूत होतात.

## ७२ कुरकुला.

कुरकुला हा एक चिखलांत व सर्व जमिनींत होणारा रोपा आहे. याची आकृति अळवासारखी आहे. याची उंची वितीच्या वर नसते. पान कारंद्याच्या पानासारखें असून वाटोळें व फार लहान असतें. कुरकुल्याचें एकच पान वर येतें, तेव्हां तो देंठासुद्धां तोडून काढतात. त्याची भाजी अळवासारखी परंतु बुळबुळीत होते. यांत डाळ घातली पाहिजे.

## ७३ कुरडू ( सं. भूरुंडी ).

ही भाजी पांढऱ्या माठासारखी आहे. परंतु ती रानभाजी असल्यामुळें कोणी लावीत नाहींत. पावसाळ्यांत ही आपोआप उगवते. हिची उंची सुमारें २ हात असते. हिचीं पानें पातळ असून हीस बीं फार येतें. हिच्या शेंड्यावर पांढऱ्या रंगाचे झुपके येतात; त्यांत हिचें बी असतें. हें बीं थंड आहे. तांबड्या जातीचीं फुलें ज्या कुरडूवर येतात, तीस " देवकुरडू " असें म्हणतात.

कुरडू—तुरट, ग्राहक, उष्ण, रसायन, मेधा व रुचि यांचा नाश करणारी, शीत, रुक्ष, अग्निदीपक, अविदाही, लघु, स्वादु, हृद्य व वृष्य असून त्रिदोष, ज्वर, मेह, श्वास, दाह, मेद, कुष्ठ, भ्रम व अरुचि यांचा नाश करिते. ( १ ) **मुतखडा व मूत्राघातावर**—कुरडूचें बीं १ मासा व खडीसाखर १ मासा एकत्र करून घ्यावें. मूत्र बंद झालें असल्यास हें औषध दोन तीन वेळ घ्यावें, म्हणजे मूत्र सुटेल. ( २ ) **भांग, गांजा यांवर उतार**—कुरडूचीं मुळें थंड पाण्यांत उगाळून तें पाणी शक्त्यनुरूप द्यावें. ( ३ ) **कफमूत्रकृच्छ्रावर**—ताकाबरोबर कुरडूचें बीं कुटून घ्यावें.

## ७४ कुलित्थ.

यांस हुलगे असें म्हणतात. जसें तृणधान्यांत हरीक केवळ गरीब धान्य, तसें द्विदल धान्यांत कुलित्थ हें आहे. हें धान्य सर्वत्र होतें. हें झाड लहान असतें. याची उंची एक हात असते. या झाडाची आकृति व पानें कांहींशीं उडदासारखींच आहेत. याची शेंग किंचित् वांकलेली व चपटी असते. कुलित्थांचा रंग तांबूस असतो. कोठें काळ्या व पांढऱ्या रंगाचेही कुलित्थ होतात. कुलित्थ घोड्यांस व दुभत्या गुरांस खावयास घालतात. कुलित्थ उकडून त्याच्यावरचें पाणी काढून त्याचें सार करितात. त्यास काट असें म्हणतात. बहुधा रोगी मनुष्यास या प्रकारच्या सारानें भात जेवावयास घालतात.

कुलित्थ—मधुर, तीक्ष्ण, रक्तपित्तकारक, सारक, घर्माला शोषण करणारा, उष्ण, पाककाळीं आंबट, तिखट, विदाही, तुरट, रूक्ष, पित्तल, लघु; व उचकी, कफ, श्वास, कास, वात, अश्मरी, दृष्टिरोग, पीनस, आनाह, शुक्र, गुल्म, अर्श, ज्वर, मद, कृमि व सूज यांचा नाश करितो. ( १ ) **वायूचा विकार न होण्यास**—कुलित्थांचा काढा द्यावा, म्हणजे रोगी मनुष्यास वायूचा विकार होत नाहीं. ( २ ) **गंडमाळांवर**—हुलगे व मिरी यांचा काढा द्यावा. ( ३ ) **अतिसारावर**—हुलग्याचीं झाडें ठेंचून त्यांचा रस १ तोळा व कात पाव तोळा हीं एकत्र करून दिवसांतून तनि वेळ द्यावी. ( ४ ) **घाम बंद होण्यास**—भाजलेल्या हुलग्यांचें पीठ अंगास

चोळावें. ( ५ ) **उरांतून व पोटांतून रक्त पडतें त्यास**—पावशेर कुळित्थ शिजत घालून त्यांत ९ बिबवे कापून घालावे व तें काट प्रत्यहीं पिण्यास द्यावें. ( ६ ) **शूलावर**—कुळित्थांचा काढा करून हिंग, बिडलोण व सुंठ यांचें चूर्ण घालून घ्यावा. ( ७ ) **मुतखड्यावर**—कुळित्थाचा काढा उन्हाळीचें चूर्ण व सैंधव २ मासे घालून घ्यावा.

## ७५ कुवा.

या वृक्षास ' नागिणीचा वृक्ष ' असेंही म्हणतात. हे वृक्ष सह्याद्रीच्या प्रदेशांत पुष्कळ होतात. यांजपासून फारशी छाया मिळत नाहीं. कारण हा ९०।६० हात उंच वाढतो, व २–२॥ हात रुंद असून वरही फारसा विस्तृत होत नाहीं. या वृक्षाचें लाकूड कठीण व सरळ असतें. यास्तव तारवास याच्या डोलकाठ्या करितात. गोमांतक व कर्नाटकांत यास कुवा म्हणतात. यास नागाच्या फणीसारखीं तांबडीं फळें येतात. म्हणून यास नागिणीचा वृक्ष असें म्हणतात. याचें फळ फोडलें म्हणजे त्यास विलक्षण वास असून त्यांत दोन काळ्या बिया असतात. त्यांतील गीर मुलें खातात. याचें लाकूड पुष्कळ कामांस उपयोगी पडतें.

## ७६ कुसर [ सं. माधवी, वासंती. ]

कुसरीच्या वेलीस कस्तुरमोगरा, मधुमाधवी, असेंही म्हणतात. हिचीं पानें मोठीं असतात. फुलें पांढरीं शुभ्र असून, तीं जाईचे फुलांहून मोठीं असतात. या वेली जंगलांत पुष्कळ होतात. फुलांचा बहार वसंतऋतूमध्यें असतो. हीं फुलें फुललीं म्हणजे यांचा चोहोंकडे मधुर सुवास सुटतो.

कुसर—तिखट, कडू, तुरट, मंदगंधी, मधुर, शीतल, लघु असून पित्त, कास, व्रण, दाह, शोष व त्रिदोष यांचा नाश करिते. ( १ ) **वाट सरल्यास**—कुसरीचे पाल्याच्या दोन पैसेभार रसांत तितकेंच तूप घालून ३ दिवस देणें. ( २ ) **कफविकारानें मुलांस वायगमन झाल्यास**—कुसरीचीं पानें ७ घेऊन त्यांत मिरें ७ व लसणीच्या पाकळ्या ७, शेवग्याची साल ४ मासे व तांबड्या हसाणीची साल ४ मासे, हीं सर्व एकत्र करून थंड पाण्यांत वाटावीं व वस्त्रगाळ करून रस एक तोळापर्यंत

काढून शक्तीप्रमाणें एक वेळ दिला असतां, वमन किंवा रेच होऊन विकार शमन होतो. ( ३ ) **मुलांच्या कफविकारावर**—कुसरीचें पान अर्धे व तांबड्या अगस्त्याचीं पानें चार व मिऱ्याचे दाणे २ हीं वाटून त्यांचा रस काढावा. त्यांत उडदाच्या डाळीएवढी टांकणखाराची लाही व रसाच्याइतकीच मध घालून चाटण करून द्यावें.

### ७७ कुहिरी ( सं. मर्कटी. गु. कौचो. )

कुहिरीचीं रोपें रानांत मृगाचा पाऊस पडूं लागला म्हणजे चोहोंकडे उगवतात. मग त्यांचे मोठे वेल होऊन झाडावर किंवा कुंपणावर चढतात. कुहिरीच्या वेलास पानाच्या बाजूस लांब देंठ फुटून त्यास फुलांचा तुरा येतो. एका तुऱ्यांत वीस पंचवीस फुलें असतात. या फुलास एक एक बोट लांब व तितक्याच जाड अशा शेंगांचे घोंस लागतात. दर घोंसांत पांचपासून दहापर्यंत शेंगा असतात. या शेंगांवर बारीक कांटे असतात. हे कांटे अंगास लागले कीं, अंगाची विलक्षण आग होऊन ती जागा सुजते; फोड आणण्याच्या कामीं यांचा उपयोग करितां येतो. शेंगांतील बियांस ' कवचबीज ' असें म्हणतात. कुहिरींत २ जाती आहेत. ( १ ) रेडेकुहिरी, ( २ ) मेंढे कुहिरी अथवा गोडी कुहिरी; पैकीं मेंढेकुहिरीची शेंग किंचित् मोठी व नाजूक असून वरील कांटे जलाल नसतात. या शेंगेवरील कांटे सुरीनें काढून टाकून त्याची भाजी करितात. ही हिरव्या केळांच्या भाजीसारखी लागते.

कुहिरी मधुर, वृष्य, शीत, धातुवर्धक, बलकर, गुरु व कडू असून क्षय, वायु, पित्त, शीत, रक्तदोष, व्रण, कफ व रक्तपित्त यांचा नाश करिते. हीचें बीज—धातुवर्धक, वृष्य, शीतळ, स्वादु, गुरु; व वात, दुष्टव्रण व रक्तपित्त यांचा नाश करितें. ( १ ) **जंतावर**—कुहिरीच्या शेंगेवरील थोडेसे कांटे दुधांत किंवा गुळांत घालून ते लहान मुलास द्यावे. हें औषध फार देऊं नये. यानें जंताचा उपद्रव त्वरित दूर होतो. हें मोठें रामबाण औषध आहे. ( २ ) **कुहिरीचे विषास**—तूप, साखर व मध हीं एकत्र करून द्यावें. ( ३ ) **लहान वासरांस जंत झाल्यास**—कुहिरीचें मूळ पाण्यांत

उगाळून पाजावें अथवा कुहिरीचीं कुसें ताकांत पाजावीं. ( ४ ) **गर्भधारणास**—गोड कुहिरीची मुळी व कवठाचा गीर हीं दुधाशीं वाटून द्यावी. ( ५ ) **धातुपुष्टतेस**—कवचबीज व तालीमखान्याचें चूर्ण साखरेबरोबर खावें; व वर धारोष्ण दूध प्यावें. ( ६ ) **सोमलाचे विषास**—खाजकुहिरीची साल व पांढरा कात एकत्र करून पाण्यांत वाटून थोडथोडें पाणी पाजीत जावें. ( ७ ) **मूर्च्छा दूर होण्यास**—कुहिरीचीं कुसें अंगास लावावीं. ( ८ ) **श्वासावर**—कुहिरीच्या बियांचें चूर्ण प्रातःकाळीं मध व तूप यांबरोबर चाटावें. ( ९ ) **गांठ, बद व मांजरी यांवर**—कुहिरीचें बीं उगाळून त्याचे दिवसांतून दोन तीन लेप करावे.

## ७८ कुळई ( सं. सुषवीपुष्प. )

ज्येष्ठ अखेरीच्या सुमारास जेव्हां एकदां पाऊस पडतो, तेव्हां ही भाजी रानांत जिकडे तिकडे होते. तांबडमातीच्या जमिनींत व डोंगरी प्रदेशांत ही पुष्कळ सांपडते. या भाजीचे कांदे पांढरे असून ते जमिनींत असतात. ही भाजी केवळ गवतासारखी आहे. कुळई—भाजी कोंवळी असतां खावयास उपयोगी आहे. हीस लहान पांढरीं फुलें येतात. ही भाजी खावयास चांगली आहे. ही भाजी घेऊन पिळून टाकतात, अथवा आधीं मीठ लावून पाणी काढून पिळून, मग फोडणीस टाकतात. हीस ‘ फोडशी ’ असेंही म्हणतात.

## ७९ केवडा ( सं. केतकी. )

केवड्याचें झाड दोन पुरुष उंच वाढतें. याचीं लांबच लांब बेटें वाढतात. हीं झाडें बहुतेक ठिकाणीं होतात. याचे पातीस कांटे असतात. केवड्याचीं वनें फार दाट असतात. यांत पांढरा व पिंवळा अशा दोन जाती आहेत. पांढऱ्या जातीस केवडा व पिंवळीस केतकी म्हणतात; केतकीस वास फार येतो व तिची पाती फार सुकुमार दिसते. श्रावणांत केवड्यांचा भर असतो. केतकी माघ व फाल्गुन या महिन्यांतच होते. पांढरे केवडे बारमाही होतात केवड्यांच्या वनांत सर्प राहतात. कर्नाटकांत या झाडाच्या पातीच्या छऱ्या व हांतऱ्या करितात. ही पाती कातारी

लोकांस फार उपयोगी पडते. केवडयाचें तेल काढतात. तें फार सुवासिक असतें. केवडयाच्या पानांत केलेल्या कातगोळ्या फार सुवासिक होतात. केवडयाच्या आंत जी कांजीण असते तिची भाजी करितात.

**श्वेत केतकी**—तिखट, गोड, कडू, लघु; व विष व कफ यांचा नाश करिते. हिचें फूल—लघु, तिखट, कडू, कांतिकर, उष्ण; व वायु, कफ व केशांची दुर्गंधि यांचा नाश करितें. त्याचें केशर शिऱ्याचें नाशक व किंचित् उष्ण आहे. हिचें फळ—गोड असून वायु, मेह व कफ यांचा नाश करितें. **सुवर्णकेतकी**—कडू, नेत्रांला हितावह, उष्ण, लघु, तिखट, मधुर, विषदोष व कफ यांचा नाश करिते. **हिचें फूल**—सुखकर, कामोद्दीपन, किंचित् उष्ण, कडू, तिखट, नेत्रहितावह आणि सुगंधि आहे. **हिच्या पारंब्या**—अति थंड, देहाला दृढ करणाऱ्या, तिखट, बलकर, रसायन, पित्त व कफ यांचा नाश करितात. **हिच्या फळाचे व केशराचे गुण**—श्वेतकेतकीचें फळ व केशर यांसारखेच आहेत. ( १ ) **रक्तप्रदरावर**—केवडयाची मुळी पाण्यांत उगाळून खडीसाखर घालून द्यावी. ( २ ) **अपस्मारावर**—केवडयाच्या कणसावरील मुकटा व केतकीचा फुलोरा समभाग घेऊन एकत्र कुटावा व तें चूर्ण तपकिरीप्रमाणें नाकांत ओढावें. (३) **उष्णतेनें कपाळ उठतें त्यावर**—केवडयाचें पाणी व पांढरें चंदनाचें गंध हीं एका कांचेच्या बाटलींत घालून त्या बाटलीच्या तोंडावर बारीक फडकें बांधून ती बाटली वरचेवर हलवून हुंगीत जावी; म्हणजे कपाळ रहातें. ( ४ ) **प्रमेहावर**—केतकीचें मूळ वाफून त्याचा रस २ तोळे व साखर २ टांक एकत्र करून घ्यावें. ( ५ ) **सर्व प्रकारच्या उष्णतेवर**—केवडयाच्या पातीच्या रसांत जिरें वांटून साखर घालून तो रस ७ दिवस द्यावा. पथ्य ताकभात अळणी ( ६ )**कंठरोगावर**—केवडयाच्या कणसाच्या आंतील फुलाची विडी करून ओढावी; म्हणजे कंठसर्पादि रोग दूर होतात. ( ७ ) **मुसळ्या रोगावर**—केवडयाच्या कांद्याचा रस पाजावा.

### ८० केवण ( सं. ऋद्धि. )

केवणीस ' मुरुडशिंगी ' असेंही म्हणतात. केवणीचें झाड साधा-

रण पुरुषभर उंच वाढतें. हिचीं पानें फार मोठीं नसतात. हीस तोडच्याच्या मुरडीप्रमाणें मुरड घातलेल्या शेंगा येतात. यावरून हीस मुरुडशिंगी असें नांव पडलें असावें.

**मुरुडशेंग**—मधुर, स्निग्ध, मेधाकर, शीतल, कफकर, शुक्रवर्धक, प्राणधारक, ऐश्वर्यकर, बलप्रद, रक्तशुद्धिकर, रुचिकारक व गुरु आहे; कुष्ठ, कृमिरोग, मूर्च्छा, रक्तपित्त, तृषा, क्षय, पित्त, वातरक्त व ज्वर यांचा नाश करिते. [१] **लहान मुलांस पोटांत मुरडा वगैरे न होण्यास**—बाळगुटींत मुरडशेंग उगाळून द्यावी. [२] **कानांत गोमाशी गेल्यास**—केवणीचें मूळ एरंडेलांत उगाळून १०।१५ वेळ कानांत घालावें; म्हणजे गोमाशी मरून फुगून वर येते. [३] **मुरडा होतो त्यावर**—केवणीचें मूळ ताकांत उगाळून घ्यावें. [४] **खांडूक व जखम वगैरेवर**—केवणीचें मूळ उगाळून वर लावावें.

## ८१ केकती.

घायपातीच्या पानांप्रमाणेंच केकतीचीं पानें असतात. परंतु त्यांहून तीं थोडीं अरुंद असतात. या पानांच्या शेवटांस करवतीप्रमाणें कांटे असतात. हीं झाडें सर्वत्र आहेत. केकतीच्या पात्या भिजूं घालून त्यांचे दोर वळतात. ते मजबूत असतात. केकतीच्या पात्यांमधून उभी व सरळ अशीं एक काठी निघते. ही काठी अबदागिरीस दांडी करण्याच्या कामीं उपयोगीं पडते. हीस कोणी 'घायाळ' असेंही म्हणतात.

[१] **कंडूवर**--केकतीच्या पानांचा रस काढून तो अंगास चोळावा. यानें आग होते. फारच आग होऊं लागल्यास शेण चोळून थंड पाण्यानें स्नान करावें. [२] **मुसळ्या रोगावर**—केकतीच्या कांद्याचा रस पाजावा.

## ८२ केशर.

केशर नेपाळ व इंग्लंड या देशांत पिकतें. केशराचें झाड लहान असतें. त्याचे कांदे दोन दोन हाताच्या अंतरानें हारीनें लावतात. ते लावल्यानंतर २।३ महिन्यांनीं झाडें होऊन त्यांस फुलें येतात. त्यांस ३ पाकळ्या

असतात; आणि आंत तंतु असतात, तेंच केशर होय. केशराचा रंग तांबूस असून तंतु लांब असले म्हणजे तें उंच प्रतीचें असें समजावें. केशर एक वर्षावर राहिलें असतां बिघडतें. हें रंगास व औषधास उपयोगीं पडतें. यास चांगला वास येतो.

**केशर**—सुगंधि, कडू, तिखट, रुचिकर, आनंदकारक, उष्ण, कांतिकर, तुरट, स्निग्ध; व कंठरोग, वायु, कफ, खोकला, मस्तकशूळ, विष, वांति, व्रण, व्यंग, कृमि, हिक्का, त्रिदोष, कुष्ठ, यांचा नाश करितें. ( १ ) **रक्तपित्तावर**–शेळीच्या दुधांत केशर शिजवून प्यावें व शेळीच्या दुधांत भात खावा. ( २ ) **अंगांतून रक्त फार गेल्यास**—मधावरोवर केशर द्यावें. ( ३ ) **पीनसरोगावर**—केशर तुपांत खलून नस्य द्यावें. ( ४ ) **अर्धशिशीवर**–केशर व तूप एकत्र खलून नस्य द्यावें. ( ५ ) **मोडशीवर**–केशर निंबाच्या रसांत द्यावें. ( ६ ) **मृत्तिकाजन्य पांडुरोगावर**—केशर, ज्येष्ठमध, पिंपळी व निशोत्तर यांचा काढा करून त्यांचीं चार पुटें मातीस द्यावीं आणि ती माती खाण्यास द्यावी; म्हणजे खाल्लेली माती पडून विकार दूर होईल. ( ७ ) **मस्तकरोगावर**–केशर व बदाम यांचा गाईचे तुपांत खल करून त्याचें नस्य द्यावें. ( ८ ) **अहिऱ्यावर**—केशर मधांत खलून त्याचें अंजन करावें. ( ९ ) **मूत्राघातावर**—रात्रीं पाण्यांत केशर भिजत घालून सकाळीं त्यांत मध घालून तें कोळून प्यावें. ( १० ) **खर पडते त्यास**—जुन्या तुपांत केशर खलून तीन दिवस प्राशन करावें. ( ११ ) **कृमींवर**–केशर व कापूर हीं दुधांतून द्यावीं. ( १२ ) **गर्भिणीच्या रक्तस्रावावर व पोटदुखीवर**—गाईचें लोणी, त्यांतील पाण्याचा अंश काढून, १ तोळा घेऊन त्यांत २ मासे केशर घालून देणें.

### ८३ केळ ( सं. कदली. गु. केर. हिं. कदली. )

केळीचीं झाडें बहुतकरून सर्व देशांत आहेत. तिच्या मुळांतून जे कोंब फुटतात ते काढून दुसऱ्या ठिकाणीं लावतात, म्हणजे तिचीं झाडें होतात. केळ्यांच्या सुमारें २० जाती आहेत. गोमांतक, कर्नाटक व वसई या प्रांतांत केळ्यांचें पीक फार होतें. वसई प्रांतांत आगाशी गांवीं सुकीं

केळीं करून तीं चहूंकडे पाठवितात. अरण्यांत बरसातींत ज्या केळी आपोआप पिकतात, त्यांस चव्हेणी अथवा ' रानकेळी ' म्हणतात. कच्च्या केळ्यांची, केळफुलांची व गाभ्याची भाजी होते. सोपटांची राख रंगाच्या उपयोगीं पडते. सूत रंगविणारे धनगर व कोष्टी इचा फार उपयोग करितात. पिकल्या केळ्यांची कोशिंबीर चांगली होते. केळीच्या योगानें हत्यारांस पाणी देतां येतें. केळीच्या पानांचे दांडोरे वाळवून जाळले असतां त्यांपासून क्षार उत्पन्न होतो. त्याचा कोंकणांत परीट लोक साबणा-बद्दल उपयोग करितात. गांवढेगांवांत ज्या गरीब लोकांस मलम म्हणून पदार्थ माहीत नाहीं, व औषध देण्यास वैद्यही नाहीं, ते लोक केळांतल्या चिकाची मलमाप्रमाणें जखमेवर पट्टी देतात; व त्यांचा तो घाय बरा होतो. पिकलेल्या केळ्यांचा खाण्याकडे उपयोग होतो. रानकेळीं कोणी खात नाहीं. त्यांच्या कच्च्या केळ्यांची, फुलांची व गाभ्याची भाजी मात्र करितात; व पानें जेवणाच्या उपयोगीं पडतात. कोळी, कातकरी, ठाकूर वगैरे गरीब लोक जमिनींतून रानकेळीचे कंद काढून, वाळवून, दळून, त्यांचें पीठ करितात व त्याच्या भाकरी करून खातात.

**केळ**—शीतळ, गुरु, वृष्य, स्निग्ध व मधुर आहे; हें पित्त, रक्त-विकार, योनिदोष, अश्मरी व रक्तपित्त यांचा नाश करितें. **पिकलेलें केळें**–बलकर, तुरट, मधुर, गुरु, शीत, वृष्य, शुक्रवर्धक, संतर्पण; आणि मांस, कांति, अरुचि यांना वाढविणारें असून दुर्जर, कफकारक असें आहे; हें तृषा, ग्लानि, पित्त, रक्तविकार, मेह, क्षुधा, नेत्ररोग यांचा नाश करितें. हें मंदाग्नि पुरुषानें भक्षिलें असतां विकार करितें. **केळफूल**–स्निग्ध, मधुर, तुरट, गुरु, ग्राहक, कडू, अग्निदीपक, वातनाशक, किंचिदुष्णवीर्य आहे. हें रक्तपित्त, क्षय, कृमि, पित्त व कफ यांचा नाश करितें. **कदलीसार**–( कालें ) ग्राहक, अप्रिय, गुरु व शीत आहे. हें तृषा, दाह, मूत्रकृच्छ्र, अतिसार, सोमरोग, अस्थिस्राव, रक्तपित्त व विस्फोट यांचा नाश करितें. **कदलीकंद**–रूक्ष, वातल, तुरट, गुरु, शीत, बलकर, मधुर, केश्य, रुच्य व अग्निमांद्यकर आहे. हा कर्णशूळ, आम्लपित्त, दाह, रक्तदोष, सोमरोग,

रजोदोष, कृमि व कुष्ठ यांचा नाश करितो. **केळीचें पाणी**—शीतळ व ग्राहक आहे; हें मूत्रकृच्छ्र, मेह, तृषा, कर्णरोग, अतिसार, अस्थिस्राव, रक्तपित्त, विस्फोट, रक्तदोष, योनिदोष व दाह यांचा नाश करितें. **रानकेळ**-शीतळ, मधुर, बलवर्धक, वीर्यवर्धक, रुच्य, दुर्जर, जड असून तृषा दाह, शोष व पित्त यांचा नाश करिते. **हिचें फळ**—तुरट, मधुर व गुरु आहे. ( १ ) **पोटांत विष गेल्यास त्यावर**—केळीच्या गाभ्याचा रस काढून पाजावा. ( २ ) **पिसाळलेल्या कुत्र्याच्या विषावर**–पिकलेल्या रानकेळ्याचें बीं खावयास द्यावें व दंशावरही वाटून लावावें. ( ३ ) **श्वासावर**—केळ्याच्या आंतील केशरयुक्त भाग पोखरून त्यांत मिऱ्याचें चूर्ण रात्रीं भरून ठेवावें; व प्रातःकाळीं तें केळ मंदाग्नीवर भाजून खावें; म्हणजे श्वासरोग लवकर दूर होतो. ( ४ ) **सुखप्रसूति होण्यास**—केळीचा कांदा कंबरेस बांधावा; प्रसूत झाल्याबरोबर सोडून टाकावा. ( ५ ) **उचकीवर**—रानकेळीच्या पानांची राख १ मासा व मध १ तोळा हीं एकत्र करून द्यावी. ( ६ ) **सुजेवर**—गव्हाची कणीक व पिकलेलें केळें पाण्यांत कालवून ऊन करून सुजेवर बांधावें ( ७ ) **सोमलाचे विषावर**—केळीच्या सोपांचा रस पावशेर पोटांत घ्यावा. ( ८ ) **जिभेस खरे येतात त्यास**—पिकलेलें केळें गायीच्या दह्याशीं सूर्योदयापूर्वी खावें. ( ९ ) **कामिणीवर**—पिकलेलें केळें मधांत कालवून खावें. ( १० ) **भस्मकरोगावर**—केळ्यांची शिकरण तुपांत करून खावी अथवा केळीच्या कालाचें पाणी काढून पीत जावें ( ११ ) **धुपणीवर व सोमरोग** ( म्हणजे मूत्रातिसाराप्रमाणें एक रोग होतो ) **त्यावर**—पिकलेलें केळें, आंवळ्याचा रस, साखर दोन भाग एकत्र करून द्यावें ( १२ ) **मूत्रकृच्छ्र म्हणजे उन्हाळ्यांवर**–गोमूत्रांत केळीचे कांद्याचा रस घालून तो द्यावा. ( १३ ) **दाह शमन होण्यास**–केळीच्या व कमळाच्या पानावर निजावें. ( १४ ) **मुलांस दंतोद्भव रोग होतो त्यावर**—केळफुलांतून ज्या ज्या बारीक पारंब्या [बाळकेळी] गळून पडतात, त्या बारीक वाटून रस काढावा आणि त्यांत थोडी जिऱ्याची पूड व खडीसाखर घालून मुलाचे

शक्तीप्रमाणें ४ मासेपासून ६ मासेपर्यंत सत। सात रोज द्यावें; व फक्त नुसता हा रसच दहा वीस वेळ हिरड्यांस लावावा; म्हणजे ताप वगैरे त्वरित शमतात. ( १५ ) **देवी हलक्या येण्यास**—रानकेळीच्या बिया म्हशीच्या दुधांत वाटून कपडछान करून तें पाजावें. ( १६ ) **मूत्राघात म्हणजे मूत्र बंद होतें त्यावर**—केळीच्या सोपाचें पाणी काढून तें ३-४ तोळे घेऊन त्यांत पातळ केलेलें तूप १।२ तोळे मिश्र करून पाजावें. याचा असा चमत्कार आहे कीं, केळीच्या पाण्यांशीं तुपाचा संयोग होऊन, पोटांत गेलेलें तूप मूत्रद्वारें फार त्वरित निघून जातें व त्या योगानें द्वार मोकळें होतें आणि लघवी सुटते. पुरुषांहून स्त्रियांस तर हें फारच त्वरित लागू पडतें. ( १७ ) **प्रदर व धातुविकार यांवर**—पिकलेलें १ केळें अर्धा तोळा तुपाबरोर दररोज सकाळीं व सायंकाळीं खात जावें. याप्रमाणें सतत आठ दिवस सेवन केलें असतां वरील विकार शमन होतात. या औषधानें कोणास थंडी झाली असें वाटल्यास यांतच मधाचे ४ थेंब घालून हें औषध घेत जावें. ( १८ ) **गुरांस सोमल घातल्यास**—केळीचा रस १ शेर काढून त्यांत तुरटी तोळे १० व पांढरा कात तोळा १ घालून तीन दिवस पाजावें. ( १९ ) **पित्तरोगावर**—पिकलेलें केळें व तूप भक्षण करावें. ( २० ) **गुरांच्या मूत्रावरोधावर**—केळीच्या सोपाचें पाणी एक शेरपर्यंत काढून त्यांत सोनकाव एक तोळा उगाळावी, व थोडें सोरमीठ आणि मिरपूड ४ गुंजांपर्यंत घालून पाजावें. ( २१ ) **केळीं खाऊन अजीर्ण झाल्यास**—वेलदोडे खावे. ( २२ ) **केळीं लवकर पिकण्यास**—लोंगराचा दांडा ४।५ बोटें ठेवून बाकीचा कापून टाकल्यानंतर त्यास खिळ्यानें टोंचून भोंक पाडून त्यांत वेलदोड्याची पूड भरावी; म्हणजे केळीं लौकर पिकतात. केळांत जर थोडीशी वेलदोड्याची पूड टाकली तर केळीं नासून जातात, असा वेलदोड्यांत गुण आहे. ( २३ ) **धुपणीवर**—केळीचीं पानें बारीक वाटून त्याचीं दुधांत क्षीर करून दोन तीन दिवस भक्षावी. ( २४ ) **ओकारीवर**—केळीच्या कांद्याचा रस मधाबरोबर प्यावा. ( २५ ) **अंगांत भिनलेली गर्मी व**

**परमा यावर**—केळीचा गाभा सावलींत सुकवून त्याचें चूर्ण करून तें साखर व पाणी यांशीं द्यावें.

## ८४ कोठिंबर.

कोठिंबर हीं कारिंटाची जात आहे; परंतु कारिंट हें फार कडू आहे; म्हणून यास गोडें कारिंट म्हटलें असतां चिंता नाहीं. हीं गुजराथेंत पुष्कळ होतात. यांची भाजी होते; व तीं वाळवून जेवणाबरोबर खातात. यांतही कडवी व गोडी अशा दोन जाती आहेत.

## ८५ कोथिंबीर. ( सं. कुस्तुंबरी. )

कोथिंबीर सर्वत्र प्रसिद्ध आहे. हिचा स्वयंपाकांत नित्य उपयोग होतो. या झाडास जें बीं येतें त्यास धने असें म्हणतात. धने मसाल्यांत घालतात. हा पदार्थ स्वादिष्ट, थंड व पित्तशामक आहे. धने फोडून लाविले असतां थोडक्याच दिवसांत जरुरीपुरती कोथिंबीर तयार होते. कोथिंबीरीच्या वड्या फार उत्तम होतात. कोथिंबिरीची चटणी होते.

**धने**—मधुर, हृद्य, तुरट, दीपन, स्निग्ध, कडू, किंचिदुष्ण, अवृष्य, मूत्रल, लघु, पाचक, ग्राहक, रुचिर; व तृषा, दाह, अतिसार, खोकला, पित्त, ज्वर, वांति, कफ, दमा, त्रिदोष, अर्श, कृमि व विशेषेंकरून पित्त यांचा नाश करितात. [ १ ] **विंचा उतल्यास**—कोथिंबीर वाटून वर लावावी. [ २ ] **अंगांतील देवीची भिनलेली उष्णता निघण्यास**—देवी चांगल्या बऱ्या झाल्यावर रात्रीं धने व जिरें चौपट पाण्यांत भिजत टाकून, सकाळीं कुसकरून गाळून त्यांत खडीसाखर घालून द्यावें. म्हणजे कोठ्यांतील उष्णता शांत होते. हा योग पांच चार दिवस करावा. [ ३ ] **आमावर**—धने व सुंठ यांच्या काढ्यांत एरंडमुळाचें चूर्ण द्यावें. [ ४ ] **अरुचीवर**—धने, वेलची व मिरीं यांचें चूर्ण तूपसाखरेंतून द्यावें. [ ५ ] **दाह व तृषा यांवर**—धने, अडुळसा, आंवळे, काळीं द्राक्षें व पित्तपापडा हीं सर्व साधारण कुटून कोऱ्या मडक्यांत घालून त्यांत पाणी घालावें व तीं तशींच एकत्र ठेवून दुसरे दिवशीं तें पाणी प्यावें. [ ६ ] **धानाचूर्ण, अग्निमांद्य, श्वास विषमज्वर व अजीर्ण यांवर**—धने, लवंगा, तेड

[ निशोत्तर ] व सुंठ यांचें चूर्ण करून तें ऊन पाण्याशीं द्यावें. [७] **ज्वरावर पाचन**-धने, देवदार, सुंठ, रिंगणी, व डोरली यांचा काढा द्यावा. [ ८ ] **पित्तज्वर व अंतर्दाह यांवर**—धने व तांदूळ रात्रीं पाण्यांत भिजत घालून ठेवावे व दुसरें दिवशीं सकाळीं त्याच पाण्यांत शिजवून पातळ पेज करून ती चांगली थंड झाल्यावर द्यावी. [ ९ ] **दाहावर**-धने रात्रौ पाण्यांत भिजत घालून सकाळीं तें पाणी गाळून घेऊन त्यांत खडीसाखर १ तोळा टाकून प्यावें. [ १० ] **मूत्राघातावर**—धने व गोखरूं यांचा काढा तूप घालून द्यावा. [ ११ ] **जेपाळाचे विषावर**-धन्यांचें चूर्ण, साखर व दहीं हीं एकत्र करून द्यावीं. [ १२ ] **गर्भिणीचे ओकारीस**-धन्यांचें चूर्ण ३ मासे, साखर १ तोळा हीं तांदुळांचे धुणांत द्यावीं. अथवा धन्याचा कल्क तांदुळांच्या धुवणांतून साखर घालून द्यावा. [ १३ ] **रक्तपित्तावर**—धने, द्राक्षें व बेदाणा यांचा काढा द्यावा. [ १४ ] **बालकाचा शूळ, आम व अजीर्ण यांवर**-धने व सुंठ यांचा काढा द्यावा. [ १५ ] **मुलांचे डोळे येतात त्यावर**—धन्यांची पोटली बांधून पाण्यांत भिजत घालून ती वारंवार डोळ्यांवर फिरवावी. [ १६ ] **उन्हाची झळ न लागण्यास**-धने कोळून त्यांत खडीसाखर घालून तें पाणी प्यावें. [ १७ ] **बालकाचा खोकला व दमा यांवर**--खडीसाखर व धने तांदुळांच्या धुणांत वाटून त्यांचें पाणी वस्त्रगाळ करून द्यावें. [ १८ ] **तृष्णारोगावर**—धने पाण्यांत भिजत घालून नंतर कोळून त्या पाण्यांत मध व पिठीसाखर घालून ठेवावें व तें पाणी वारंवार द्यावें.

## ८६ कोबी ( सं. पेली. )

ही भाजी युरोपियन लोकांनीं तिकडून या देशांत आणली आहे. यापूर्वीं इकडील लोकांस ही माहीत नव्हती असें म्हणतात. कोबींत तीन चार जाती आहेत. जिचा गड्डा बनतो ती उत्तम असते. ही भाजी उत्तम व पौष्टिक आहे.

**कोबी जिला कंद होतो ती**-मधुर, रुक्ष, स्वच्छ, शीतल, भेदक,

ग्राहक, रुचिकर, गुरु; व पित्त, कफ, वायु यांचा नाश करिते. हिच्या कंदाचेही तेच गुण आहेत. कोबी—जिच्या पानांचा गड्डा होतो ती—मधुर, वृष्य, पाककाळीं तिखट, कडू, ग्राहक, शीतळ, लघु, पाचक, अग्निदीपक, हृद्य, व वातकर असून कफ, पित्त, ज्वर, प्रमेह, कुष्ठ, खोकला, रक्तदोष व पित्तजन्य भ्रम यांचा नाश करिते.

कोरफड (सं. कुमारि. गु. कुवार. हिं. घीडकुवारी. )

हीस ' कुवारकांडें ' असेंही म्हणतात. कोरफड ही हिंदुस्तानांत सर्वत्र होते. हिच्या पात्या एकेक मनगटापेक्षांही जाड असून त्यांत बुळबुळीत गीर असतो. तो फार कडू आहे. पात्या भाजून याच्या गिराचा पातळ रस काढून, त्यांत थोडा गूळ घालून नूतन झालेल्या तान्ह्या बाळास प्रथम एक दोन दिवस पाजतात, व मग त्यास आईच्या दुधाचा अभ्यास करितात. कोरफडीस कार्तिकमार्गशीर्षाच्या सुमारास मधुन दांडा फुटून वर तुरे येतात. या दांड्यांस शेलारे असें म्हणतात. हे सोलून यांची भाजी करितात. ती उत्कृष्ट होते. याचे तुरे तुपांत तळून खातात. ही भाजी फरमाशी असून महाग विकते. गुजराथी लोक कोरफडींचें लोणचें करितात. कोरफडीच्या वरील पात्या सुकल्या कीं आंतून नव्या पात्या फुटून ही वनस्पति सर्वकाळ ताजीतवानी राहते, म्हणून हीस " कुमारी " हें नांव अगदीं अन्वर्थक आहे. कोरफड आढ्यास टांगून ठेवली तरी न सुकतां जशीची तशीच राहते, हा या वनस्पतीचा मोठा चमत्कार आहे. हिच्या बुडाशीं अंकुर फुटून हिची वृद्धि होते. कित्येक ठिकाणीं कोरफडीचीं मोठमोठीं रानें असतात. कोरफडीच्या रसापासुन ' येळ्या बोळ ' म्हणजे काळा बोळ तयार करितात. हा बोळ—सारक, रेचक व आर्तवशुद्धिकर आहे.

**कोरफड**--शीतल, कडू, मंदगंधि, रसायन, भेदक, मधुर, अग्निदीपक, पुष्टिकर, बलकर, वृष्य, व विषदोष, कफपित्तज्वर, कफ, पित्त, दमा, खोकला, प्लीहा, कुष्ठ, गुल्मवात, यकृत, ज्वर, ग्रंथि, त्वग्दोष, विस्फोट, रक्तविकार, अग्निदग्ध व्रण व रक्तपित्त यांचा नाश करिते. हिचें फूल—गुरु व वात, पित्त व कृमि यांचा नाश करितें. ( १ ) विषमज्वरावर—कोर-

फडीचा कांदा दहा मासेपर्यंत घेऊन तो कोमट पाण्याशीं घ्यावा; म्हणजे वांति होऊन कफाशयाचें शोषण होतें व विषमज्वर दूर होतो. ( २ ) **पानथरीवर व अपचीवर**—कोरफडीच्या रसांत हळद घालून द्यावी. ( ३ ) **खोकल्यास**—कोरफड फुपाट्यांत भाजून तिचा रस व अडुळशाचा रस अथवा मध यांत पिंपळी व लंवगाची पूड घालून ती द्यावी. ( ४ ) **कफास व खोकल्यास**—कोरफडीचा गीर मध अथवा सैंधव व हळद मिळवून द्यावा. ( ५ ) **डोळे येतात त्यास**—कोरफडीचा काप पाण्यांत धुऊन त्या पाण्यांत तुरटीची लाही व अफू मिसळून तें पाणी गाळून पोथांडीनें डोळ्यांवर घालावें. अथवा कोरफड व चित्रकाचीं पानें एकत्र वाटून लेप करावा. ( ६ ) **स्तनरोगावर**—कोरफडीचा कांदा उगाळून त्यांत हळदीची पूड घालून स्तनावर लेप द्यावा. (७) **वाघचवड्यास**—कोरफडीचें पान हळद घालून ऊन करून बांधावें. ( ८ ) **अंगांत गर्मी, प्रमेह, कडकी, हाडीज्वर व रसायनें मुरल्यास**—कोरफडीच्या पातींतील बलक सुमारें चार माशांपासून एक तोळ्यापर्यंत घेऊन त्यांत जिऱ्याची पूड चार गुंजा व मिरपूड २ गुंजांपर्यंत घालून घ्यावें. ( ९ ) **अग्निदग्धव्रणावर**—कोरफडीचा गीर लावावा, म्हणजे त्वरित दाहशमन होतें; अथवा कोरफडीचा गीर कपड्यांत घालून गाळून घेऊन त्या बलकांत लोण्याची विरघळ मिळवून तो पिसानें अंगास लावावा. ( १० ) **क्षतांतील कृमि मरण्यास**—कोरफडीचा कंद गोमूत्रांत उगाळून दिवसांतून दोन तीन वेळ लावावा. ( ११ ) **कोरफडीचा पाक**—कोरफडीचा गीर पाण्यांत भिजूं घालून नंतर धुवून वस्त्रावर पुसावा. नंतर इतर पाकांप्रमाणें त्याचा पाक करून तो सेवन करावा. म्हणजे अंगातील गर्मी, आम्लपित्त, कडकी हीं नाहींशीं होऊन धातु पुष्ट होते. ( १२ ) **कानाचा अतिशय दाह झाल्यास**—कोरफडीचा बलक वरील बाजूनें कानावर ठेवावा, व वस्त्रगाळ केलेलें थोडें बलकाचें पाणी कानांत घालावें. ( १३ ) **कामलारोगावर**—कोरफडीच्या कांद्याचा रस काढून त्यांत तूप घालून नस्य

करावें, म्हणजे काविळीनें डोळे पिंवळे झाले असल्यास ते साफ होतात. ( १४ ) डब्यावर—काळा बोळ व डिकेमाली एकत्र करून तें पाजावें.

## ८८ कोरला ( सं. कोविदार. )

कोरला हा एक रानवृक्ष असून तो कांचनाच्या जातीचा आहे. याचीं पानें कांचनाच्या पानांसारखींच असतात. ज्येष्ठ-आषाढाच्या सुमारास या झाडास कोंवळे पल्लव फुटतात, ते काढून विकावयास आणतात. ही भाजी निर्मळ असून खावयास रुचिकर आहे.

कोरला-दीपन, तुरट, व्रणरोपण, संग्राहक, सारक व स्वादु आहे. ही भाजी पालेभाज्यांमध्यें उत्तम आहे. कोरला-मूत्रकृच्छ्र, त्रिदोष, शोष, दाह, कफ व वायु यांचा नाश करितो. याच्या फुलाचे गुण रक्तकांचनासारखे आहेत.

## ८९ कोरांटी.

( सं. कुरंटक. गु. कांटा. अशेरियो. हिं कटशरैणा. )

हें फुलझाड तीन चार हात उंच वाढतें. याच्या सर्वांगास कांटे असतात. हींत फुलांच्या रंगांवरून पांढरी, पिंवळी, पारवी व तांबडी असे भेद आहेत. हिच्या फुलांस वास नसतो.

**पांढरी कोरांटी**—कडू, केश्य, स्निग्ध, मधुर, तिखट, उष्ण, दांतांना हितावह; व वलीपलित, कुष्ठ, वात, रक्तदोष, कफ, कंडू व दारुण विष यांचा नाश करिते. **तांबडी कोरांटी**—कडू, वर्णकारक, उष्ण, तिखट; व शोथ, ज्वर, वातरोग, कफ, रक्तविकार, पित्त, आध्मान, शूल, दमा व खोकला यांचा नाश करिते. **पिंवळी कोरांटी**—उष्ण, कडू, तुरट, अग्निदीपक; व वायु, कफ, कंडू, सूज, रक्तविकार, त्वग्दोष यांचा नाश करिते. **निळी कोरांटी**—कडू, तिखट; व वात, कफ, सूज, कंडू, शूल, कुष्ठ, व्रण आणि त्वग्दोष यांचा नाश करिते. ( १ ) **मुलांस पडसें-खोकला झाल्यास**—कोरांटीच्या पानांचा रस काढून तो मधाशीं द्यावा. ( २ ) **वीर्यपतनावर**—पांढरे कोरांटीच्या पानांचा रस, जिरें घालून ७ दिवस घ्यावा. ( ३ ) **पित्तास**—कोरांटीचा, काळ्या तुळशीचा व माक्याचा पाला

हे एकत्र वाटून गाईचे दुधांत कालवून द्यावे. ( ४ ) **दाढ दुखेल तर**—पिंवळे कोरांटीचा पाला व अक्कलकाला एकत्र वाटून दाढेखालीं धरावा. ( ५ ) **तोंड आलें तर**—पिंवळे कोरांटीचा पाला, जांभळीची साल व आंवळकाठी यांचा काढा करून गुळण्या कराव्या. ( ६ ) **गर्भधारणास**—कोरांटीची मुळी गाईचे तुपांत उगाळून ऋतुकाळीं द्यावी. ( ७ ) **दांतांतून रक्त येत असल्यास**—कोरांटीचा रस व मध दांतांस लावावा. ( ८ ) **दंतकृमीवर**—कोरांटीचीं पानें चावावीं व दाढेखालीं धरावीं. ( ९ ) **वातरोगावर**—पिंपळी, कोरांटी, देवदार, सुंठ यांचा काढा एरंडेल मिश्र करून द्यावा; म्हणजे शरीर वायूनें जखडलें असलें तरी नीट होऊन, तो शीघ्र व मंद जसा पाहिजे तसा चालेल. ( १० ) **सुजेवर**—कोरांटीच्या पाल्याचा रस विषम बाजूकडील कानांत पिळावा. ( ११ ) **बाळंतरोगावर**—कोरांटीचा काढा करून त्यांत पिंपळीचें चूर्ण घालून तो घ्यावा. अथवा कोरांटीचें मूळ चावून खावें. किंवा कोरांटीचा काढा करून रात्रभर ठेवून तो सकाळीं घ्यावा.

### ९० **कोलिंजन** [ सं. कुलिंजन. ]

आंबेहळदीसारखींच रानांत कोलिंजनाचीं झाडें होतात. याचें झाड आंबेहळदीपेक्षां किंचित् मोठें होतें. याच्या पानांचा वास मधुर असून, मुंडल्यांचा रंग पांढरा व तिखट असतो. गोमांतक व मलबार प्रांतांत हीं झाडें पुष्कळ होतात. याचे गड्डे सुकवून ठेवतात, त्यांस कोलिंजन म्हणतात. कोलिंजनाच्या गड्ड्याचे कापटे करून ते लोणच्यांत घालतात.

**कोलिंजन**—तिखट, कडू, उष्ण, अग्निदीपक, रुचिकर, स्वर्य, हृद्य, व मुख, कंठ यांची शुद्धि करणारें, मुखदोष, कफ, खोकला, वायु, यांचा नाश करितें. मोठें याहून गुणांनीं कमी आहे. ( १ ) **डांग्या खोकल्यावर**—याच्या मुंडल्यांची कढी करून द्यावी, अथवा त्यांचा रस काढून पाजावा. ( २ ) **चढलेलें मस्तक उतरण्यास**—कोलिंजनाचें चूर्ण करून तें नाकांत ओढावें; म्हणजे शिंक येऊन मस्तक उतरतें. ( ३ ) **वायूनें**

अग धरल्यास—कोलिंजनाचें चूर्ण अंगास चोळावें. (४) स्वरभेदावर—कोलिंजन तोंडांत धरून त्याचें पाणी गिळीत जावें. (५) मोडशी-वर—कोलिंजन व सैंधव, आमसुलाचे तेलांत कालवून, मंदोष्ण करून, अंगास चोळावें; म्हणजे मोडशी, खल्लीशूल (हात, पाय, पोटऱ्या, मांड्या, यांत होणारा शूळ) यांचा नाश होतो. (६) ओकारीवर—कोलिंजनाचा एक तोळा रस काढून, त्यांत निंबाचा रस एक तोळा व आल्याचा रस एक तोळा घालून, दीड तोळा खडीसाखर घालावी व तें शिजवून ठेवावें. हें प्रतिवेळीं अर्धा तोळाप्रमाणें दुवक्त, तीन दिवस घ्यावें. (७) बहुमूत्ररोगावर—कोलिंजनाचा अष्टमांश काढा करून दुवक्त घ्यावा. (८) मुलांच्या अतिसारावर—कोलिंजन ताकांत उगाळून थोडा हिंग लावून कढी करून द्यावी. (९) स्वरभंगावर—कोलिंजन तोंडांत धरून रस गिळीत जावा. (१०) मुखदुर्गंधि दूर होण्यास—कोलिंजनाचें चूर्ण मधांत कालवून दांतांस लावीत जावें. (११) दंत-रोगावर—कोलिंजनाचें चूर्ण मधांत कालवून त्यानें दांत घांसावे.

## ९१ कोशिंब (सं. कोशाम्र.)

कोशिंबाचीं झाडें मोठमोठीं होतात. त्याची उत्पत्ति डोंगराळ प्रदेशांत होते. कोंकणप्रांतीं हीं झाडें पुष्कळ होतात. याचें लांकूड चिवट असतें. याच्या लांकडाचा गाभा तांबूस रंगाचा असतो. याच्या बियांचें तेल काढतात; तें कडू, मधुर, बल्य, पथ्य, रुचिकर, पाचक व सारक असून कृमि, कुष्ठ व व्रण यांचें नाशक आहे.

**कोशिंब**—आंबट, गुरु, शोषकर, पित्तल, कफकर, कोष्ठशोधक; व वायु, कुष्ठ, अर्श, सूज, पित्तव्रण, रक्तपित्त, रक्तरोग, यांचा नाश करितो. याचें पक्व फळ—लघु, अग्निदीपक, रुचिकर, स्निग्ध, उष्ण, मधुर, बल-कर, हृद्य, वृष्य व वातकफविनाशक आहे.

[ १ ] जुलाबास—कोशिंबाचें तेल ऊन पाण्यांतून घ्यावें. [ २ ] खरूज, व्रण, व कुष्ठ यांवर—कोशिंबाचें तेल लावावें. (३) कुसडा

(कुसरडा) लागल्यास—कोशिंबाच्या सालीचा रस काढून त्यांत समुद्रफळ उगाळून त्याचा लेप करावा.

## ९२ कोष्ठ (सं. गु. कठ. हिं. कोष्ठ.)

याची उत्पत्ति काश्मीर देशांत होते. पुष्करमूळ म्हणून जी औषधि आहे, तो याचाच एक प्रकार आहे.

**कोष्ठ**—उष्ण, तिखट, कडू, गोड, वृष्य, शुक्रल, रसायन, कांतिकारक, लघु, वातकफनाशक; व कुष्ठ, विष, विसर्प, कंडू, दद्रु, त्रिदोष, पामा, रक्तदोष, खोकला, वांति, तृषा यांचा नाश करितें. लेपानें वातव्याधिनाशक आहे. (१) **मस्तकसंबंधीं पीडेवर**—कोष्ठ व एरंडमूळ कांजींत वाटून लेप करावा. (२) **गुल्मावर**—कोष्ठ, सज्जीखार व केतकीचा क्षार हीं तेलांत मिश्र करून द्यावीं. (३) **खवड्यावर**—कोष्ठाचें चूर्ण खापरांत भाजून तेलांत कालवून त्याचा लेप करावा. (४) **वातव्याधीवर**—कोष्ठ उगाळून अंगास लेप करावा.

## ९३ कोहळा (सं. कुष्मांड.)

कोहळ्याचा वेल गिराप्रमाणेंच असतो. याचें फळ लहान भोंपळ्याएवढें असतें. कांहीं कोहळे हात दीड हात लांब असतात. चांगली जमीन असल्यास एका वेलापासून पन्नास साठ देखील कोहळे होतात. कोहळ्याचा पाक होतो; तो पौष्टिक आहे. याची भाजी व सांडगे करितात. कोहळा फार थंड आहे. जून वांगें आणि कोंवळा कोहळा हीं खाऊं नयेत. तीं विषासारखीं बाधक होतात. याविषयीं वचन आहे—

" वृंताकं बहुबीजानां कूष्मांडं कोमलं विषम् "

कोहळे एक वर्षपर्यंत टिकतात.

**कोहळे**—वृष्य, पुष्टिकर, धातुवर्धक, बस्तिशुद्धिकारक, बलकर, अतिगोड, शीतल, गुरु, रुक्ष, सारक, हृद्य, कफकर; व मूत्राघात, प्रमेह, मूत्रकृच्छ्र, अश्मरी, तृषा, अरुचि, वातपित्त, रक्तविकार, वायु व रेतोविकार यांचा नाश करितो. **तो कोंवळा असतां**-अतिशीत, दोषकर, पित्तहर आहे. **तोच जून असतां**—कफकारक; आणि **पिकला असतां**-किंचित्

शीतल, दीपक, लघु, स्वादु, खारट, बस्तिशुद्धिकारक, सर्वदोषनाशक व पथ्यकर आहे; व त्याचा गीर—मधुर, वृष्य, बस्तिशुद्धिकारक व पित्त-नाशक आहे. ( १ ) **स्थावर व जंगम सर्व विषांवर**—कोहळ्याचा रस काढून पाजावा; किंवा तुकडा खावयास द्यावा. ( २ ) **मद्यावर व कोद्रूचे ( हरकाचे ) विषावर उतार**—कोहळ्याचा रस गूळ घालून पाजावा. ( ३ ) **अपस्मारावर**—कोहळ्याच्या गिराच्या रसांत ज्येष्ठमध उगाळून प्यावें. ( ४ ) **उन्मादावर**—कोहळ्याच्या रसांत कोष्ठकोळिंजनाचें चूर्ण मध घालून द्यावें. ( ५ ) **मांडपुळीस**—कोहळा किसून त्यांत मोठें मीठ बारीक मिसळावें व तें पुळीवर बांधावें. ( ६ ) **काविळीस**—कोहळीचा पाला वाटून त्यांत हळदीची पूड मिळवून तो दह्याबरोबर ७ दिवस द्यावा. ( ७ ) **आम्लपित्तावर**—कोहळ्याचे रसांत साखर घालून द्यावी. ( ८ ) **रक्तशूलावर**—कोहळ्याच्या गिराच्या रसांत २ तोळे लाखेचें चूर्ण घालून द्यावें. ( ९ ) **श्वासकासावर**—कोहळ्याच्या मुळांचें चूर्ण कोमट पाण्याशीं प्राशन करावें. ( १० ) **शूलावर**—कोहळा सोलून फोडी उन्हांत वाळवून, भांड्यावर झांकण ठेवून चुलीवर खालीं जाळ लावून, राख न होतां निखारे होईतोंपर्यंत जाळून, पाण्यानें विझवून थंड झाल्यावर चूर्ण करून, दोन मासेप्रमाणें घेऊन, तितकेंच सुंठीचें चूर्ण मिश्र करून ऊन पाण्याबरोबर नित्य भक्षावें; म्हणजे असाध्य शूलाचाही नाश होईल. ( ११ ) **अश्मरी व शर्करा यांवर**—कोहळ्याचा रस हिंग व जवखार घालून द्यावा.

## ९४ कोळसुंदा.

( सं. कोकिलाक्ष. गु. एखरो. हिं. तालिमखाना. )

कोंकणांत व इतर ठिकाणीं कोळसुंदा, शेताच्या बाजूस व ओहोळाच्या कांठीं होतो; तेथें गुरें देखील हा खात नाहींत. हें झाड सुमारें दोन अडीच हात उंच वाढतें. याच्या कोंवळ्या पाल्याची भाजी खातात. याचीं पानें लांबट असून हरएक पानाखालीं एक एक कांटा असतो. या झाडास कोलिस्ता, विखारा किंवा कोळसा असेंही म्हणतात. यास जें बी

येतें त्यास तालिमखाना म्हणतात. हें बीं पाण्याचा स्पर्श झाला असतां बुळबुळीत होतें.

( १ ) **अतिसारावर**–तालिमखाना दह्यांत वाटून द्यावा. ( २ ) **क्षतकासावर**–तालिमखान्याचें चूर्ण, मध व साजूक तूप यांत द्यावें. ( ३ ) **धातुपुष्टतेस**—तालिमखान्याचें चूर्ण साखरेबरोबर खावें व वर धारोष्ण दूध प्यावें. अथवा तालिमखाना, मुसळी, गोखरू यांचें चूर्ण गाईचे दुधांत साखर टाकून त्यांतून ध्यावें. ( ४ ) **प्रमेहावर**—तालिमखाना दुधांत शिजवून द्यावा. ( ५ ) **योनिसंकोच होण्यास**–तालिमखान्याचे काढ्यांत त्याचेंच चूर्ण घालून आंतून लेप द्यावा. ( ६ ) **पुष्टिदायक पाक**—तालिमखाना, गोखरू, कवचबीज, बळबीज, काळी मुसळी, शतावरी, सालमिश्री, पंजाबी मिश्री व पांढऱ्या गुलबाशीचा कांदा किंवा चोपचिनी यांची पूड करून, तुपांत साधारण तळून, साखरेचा पाक खवा घालून तयार करून त्यांत घालावी व सारखी घोटून एकत्र करून त्यांत बदाम, चारोळी, पिस्ते व किसमीस घालून अक्रोड, वेलची, केशर, लवंग, जायफळ, पत्री, दालचिनी व गुळवेलीचें सत्व वगैरे घालून वड्या करून ठेवाव्या. हा नित्य २ तोळे खाऊन वर गाईचें निरसें दूध प्यावें.

### ९५ खजूर ( सं. खर्जुर. गु. खजूरीओ. हिं. खर्जूरी. )

खजुराचें झाड शिंदीप्रमाणें उंच वाढतें. खजुराचीं झाडें या देशांत पुष्कळ आहेत, परन्तु त्यांपासून खजूर उत्पन्न होत नाहीं. त्यांस खजुरासारखीं फळें येतात; पण लोकांस पिकविण्याची कृति माहीत नसल्यामुळें किंवा इकडील हवा योग्य नसल्यामुळें तीं पिकत नाहींत. अरबस्तान व इराण येथें खजूर पुष्कळ पिकतो. जीं फळें अर्धकच्चीं वाळवितात त्याच खारका होत. आरब लोक खजूर खाऊनच पुष्कळ दिवस काढतात. खजूर हा पाचक व पौष्टिक आहे. खजुराच्या बियांचें तेल काढतात. तें जाळण्याच्या व औषधाच्या उपयोगीं पडतें. बियांची पेंड गुरांस घालतात. खजुराच्या झाडाच्या पातीच्या केरसुण्या, हाथऱ्या इत्यादि होतात. लांकूड घरकामास उपयोगीं पडतें. उन्हाळ्यांत खजुराचें सरबत करून

पितात. त्यांत पाणी मिळाल्यानें तो समशीतोष्ण होतो. खारकेची बी मुलांस बाळगुटींत उगाळून देतात.

**खजूर**—( पेंडखजूर ) वृष्य, स्वादु, शीत व गुरु असून अग्निमांद्य, कृमि, धातुवृद्धि, तृप्ति व पुष्टि यांना करणारा; हृद्य, बल्य, दुर्जर, स्निग्ध, पाककाळीं व रसकाळीं मधुर; व रक्तपित्त, पित्त, दाह, श्वास, कफ, श्रम, क्षतक्षय, विष, तृष्णा, शोष व आम्लपित्त यांचा नाश करितो. **सिलेमानी खारीक**—भ्रांति, श्रम, मूर्च्छा, रक्तपित्त व दाह यांचा नाश करिते. ( १ ) **रेच होण्यास**—खजूर रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं कुसकरून तें पाणी प्यावें; म्हणजे रेच होतात. ( २ ) **मूळव्याधीवर**—खारकेची बी बारीक करून धुरी द्यावी. ( ३ ) **आगपैणीवर**—खारकेची बी जाळून, तिच्या राखेंत कापूर व तूप हीं खलून त्याचा लेप करावा. ( ४ ) **कपाळ दुखत असल्यास**—खारकेची बी उगाळून डोक्यावर घालावी. (५) **घोड्यास सर्दी झाल्यास**—खारकेच्या बीचें चूर्ण करून तें पिठांत घालून द्यावें. ( ६ ) **आमवातावर**—पावशेर खजूर कोळून पाजावा. ( ७ ) **धातुपुष्टतेस व पित्तशमन होण्यास**—खारकांतील बिया काढून साधारण कुटाव्या. त्यांत बदाम, बेदाणा, पिस्ते, चारोळ्या, खडीसाखरेची पूड वगैरे मसाला एकत्र करून तें मिश्रण भिजेल इतक्या बेतानें पातळ केलेल्या तुपांत भिजत घालावें. सतत आठ दिवस चांगलें मुरल्यावर तें नित्य सकाळीं २ तोळे सेवन करावें. ( ८ ) **हिंवतापावर**—खारकेची बी व आघाड्याची मुळी थंड पाण्यांत गंधाप्रमाणें उगाळून विड्याच्या पानास चुन्याप्रमाणें चार गुंजा लावून, सुपारी, लवंग, वेलची, कात वगैरेंसह तीन विडे तयार करावे. ताप येण्यापूर्वी एकेक घटकेच्या अवकाशानें एकेक विडा खावा. याप्रमाणें तीन दिवस करावें; म्हणजे पाळीनें येणारा ताप जातो. ( ९ ) **जीर्णज्वरावर**—खारीक, सुंठ, द्राक्षें, साखर व तूप हीं दुधांत घालून तें दूध कढवून द्यावें. ( १० ) **दाह होऊं लागल्यास**—अर्धा पावशेर खजूर पाण्यांत कोळून पाजावा. ( ११ ) **चेतना प्राप्त होण्यास**—लोणी व खारका खात जाव्या. ( १२ ) **धनुर्वात व रक्त-**

पितीवर—खजुराचा बलक काढून आंत एरंडेल घालून द्यावें. ( १३ ) **मुलांस शक्तिवर्धक भक्ष्य**—उत्तम खजूर ६ माशांपासून २ तोळ्यांपर्यंत मुलाचे शक्तीप्रमाणें घेऊन स्वच्छ पाण्यानें धुवून पुसावा व त्यांतील आठ्या काढून थोडें दूध घेऊन त्यांत तो खजूर कांहीं वेळ भिजत घालावा. नंतर चांगला कोळून फडक्यांत गाळून तो रस दिवसांतून तीन वेळ-प्रमाणें पाजावा. हें भक्ष्य एक महिन्याहून अधिक वयाचे मुलास देण्यास योग्य आहे. मात्र प्रतिवेळीं रस नूतन काढून घेत जावा. ( १४ ) **थंड हवा असेल, किंवा मुलास सर्दीचा विकार असेल तेव्हां मुलांस देण्याचें भक्ष्य**—चांगली खारीक घेऊन ओल्या फडक्यानें स्वच्छ पुसून नंतर तींतील बी काढून टाकावी. ती गंधाप्रमाणें दुधांत उगाळून मुलांस खाऊं घालावी. किंवा त्यांतच आणखी दूध घालून पातळ करून पाजावें. हें औषध लहान मुलांस देऊं नये; प्रौढांस मात्र द्यावें. लहान मुलांस दिल्यानें पोटांत जाळें बांधलें जातें व कोठ्यांत गरमी होते. ( १५ ) **मद्यावर उतार**—खजूर भिजू घालून कोळून द्यावा. ( १६ ) **प्रदरावर**—खारकेंतील बिया काढून, कुटून, तुपांत तळून त्यावर गोपीचंदनाची पूड घालून द्यावी. ( १७ ) **रक्तपित्तावर**—खजूर मधाशीं खावा.

## ९६ खटखटी.

खटखटीचें झाड दोन तीन पुरुष उंच वाढतें. याचीं पानें आकारानें धामणीच्या पानांसारखीं असून त्यांहून बारीक असतात. या झाडास चार पांच फुलांचा एक तुरा असे फुलांचे तुरे येतात. खटखटीचीं फळें खाण्यास गुळचट आहेत.

( १ ) **पुष्टतेस**—खटखटीचें मूळ दुधांत वाटून द्यावें. ( २ ) **आंव-रक्त पडतें त्यावर**—खटखटीचें मूळ दुधांत अगर पाण्यांत वाटून द्यावें. ( ३ ) **वातरक्तावर**—रोग्यानें खटखटीचीं मुळें नेहमीं जवळ बाळगावीं; खटखटीची काठी हांतात ध्यावी. **सुजेवर व गांठीवर**—खटखटीचें मूळ उगाळून लावावें; आणि नित्य दोहीं सांज गाईच्या पावशेर दुधांत खट-खटीचें मूळ २ मासे, पांढऱ्या गुलबाशीचा कंद दोन तोळे व धायटीचें

मूळ ६ मासे, उगाळून पोटांत २४ दिवस घ्यावें. यानें वातरक्त दूर होतें. ( ४ ) अतिसारावर—खटखटीचें मूळ ताकांत वाटून घ्यावें.

### ९७ खरबूज [ सं. मधुपाका, मधुफला.]

कलिंगडाप्रमाणेंच याचा वेल वाढतो. खरबूज हें फळ वाटोळें असून त्याचा बाहेरील रंग तांबूस असतो. खरबूज खाण्यास चांगलें लागतें. याची भाजीही करितात. ज्या खरबुजाच्या आंतील रंग हिरवा असतो, त्यास तरटी असें म्हणतात. हें खाण्यास फार चांगलें असतें. खरबुजें जास्त खाण्यांत आलीं कीं, उन्हाळ्यांचा उपद्रव होतो.

[ १ ] **उन्हाची झळ लागली तर**—खरबुजाच्या बिया वाटून डोकीवर घालाव्या व त्यांचा रस अंगास चोळावा.

### ९८ खरशिंग [ सं. मेषशृंगी ].

खरशिंगाच्या झाडास ' मेंढशिंग ' असेंही म्हणतात. हा वृक्ष मोठा होतो. कोकणप्रांतीं हे वृक्ष पुष्कळ ठिकाणीं होतात. यांचीं पानें कडूनिंबाच्या पानांसारखी असून त्यांहून लांबट असतात. यास एक बोट रुंदीच्या व सुमारें पाऊण हात लांबीच्या चापट शेंगा येतात. या शेंगा व झाडाचें पंचांग हें कडू असतें. याचें लांकूड साधारण कामास उपयोगी आहे. या लांकडाचे मृदंग व तबले चांगले होतात. खरसिंग हा कडू, वातहारक; व कृमि, कुष्ठ व वायु यांचा नाशक आहे.

[ १ ] **नळ फुगल्यास व पोटशूळावर**—याचा पाला अगर साल ठेंचून तिचा रस पाजावा. [ २ ] **कृमीवर**—याच्या पानांचा अगर सालीचा रस द्यावा. साल वाळली असल्यास काढा करून द्यावा. [ ३ ] **खरूज व खवडे यांवर**—खरसिंगाच्या लांकडाचें तेल पाताळयंत्रानें काढून तें वर लावावें.

### ९९ खरशिंग [ खरशृंगिका.]

हें झाड बरेंच मोठें होतें. याचीं पानें आकारानें टेंटूच्या पानासारखीं असतात. यास हात सव्वा हात लांब आणि आंगठ्याएवढ्या जाड शेंगा

येतात. या शेंगांस खरशेंगा असें म्हणतात. यास उग्रट वास येतो. याचे तुकडे करून लोणच्यांत घालतात. या शेंगांची भाजीही होते.

[ १ ] खरजेस–खरशिंगीच्या झाडाच्या सालीचें तेल पाताळयंत्रानें काढून तें लावावें.

### १०० खसखस [ सं. खस्खस. ]

खसखशीचें झाड तीन चार हात उंच वाढतें. हीस लाल रंगाचीं फुलें व बोंडें येतात. बोंडांत बीं असतें, त्यास खसखस म्हणतात. खसखशीच्या बोंडांत शस्त्रानें चिरण्या पाडून त्यांतून जो चीक निघतो त्याची अफू ( अहिफेन ) होते. ही मादक आहे. हिची गणना उपविषांत आहे. अफू फार खाण्यांत आली कीं, प्राणनाश होतो; परंतु ही बेतानें दिली असतां चांगली उपयोगी पडते; मात्र ती भेसळ केलेली नसावी. खसखशीच्या अंगीं मादकपणा नसतो. खसखशीच्या फळांवरील त्वचेस 'पोस्त' असें म्हणतात. खसखस ही पौष्टिक आहे. हिचा पक्वान्नांत व इतर पदार्थांकडे पुष्कळ उपयोग होतो. कोंवळेपणीं खसखशीच्या पाल्याची मोकळी अथवा आटींव भाजी चांगली होते.

खसखशीचें झाड ग्राहक, बलकर, गुरु, वृष्य, कफप्रद, पाककाळीं मधुर, वीर्यप्रद, कांतिकारक, बलकर; व वात, पित्त यांचा नाश करणारें आहे. याचें फळ—रुक्ष, ग्राहक व रक्तशोषक आहे. फळाची साल शीतल, लघु, कडू, ग्राहक, तुरट, वातकारक, रुच्य, सप्तधातुशोषक, पुंस्त्वनाशक, रुक्ष, मदकर, अग्निवर्धक व मोहक आहे. खसखस–कफकारक, बल्य, मधुर, ग्राहक, व वातनाशक आहे. अफू—जारण, मारण, धारण व सारण अशी चार प्रकारची आहे. ती वृष्य, बलकर, ग्राहिणी, सात धातूंचा शोष करणारी, वातपित्तकर, आनंदकारक, मादक, वीर्यस्तंभक, कडू, मधुर आहे; व सन्निपात, कृमि, कफ, पांडु, क्षय, मेह, दमा, खोकला, प्लीहा, धातुक्षय यांचा नाश करिते. जी श्वेतवर्ण असून अन्नाला जिरविते तिला जारण म्हणतात; व काळी असते ती मृत्युकारक, म्हणून मारण म्हणतात. जी पिंवळी, ती जरानाश करणारी, तिला धारण

म्हणतात; व जी चित्रवर्ण, ती मळाचें सारण करिते, म्हणून तिला सारण म्हणतात. ( १ ) **आमातिसारावर**—खसखस दह्यांत वाटून द्यावी. ( २ ) **मुलांस आंव पडते त्यास**—खसखशीची थुली करून द्यावी. ( ३ ) **सांधा लचकतो त्यास**—खसखशीच्या बोंडांच्या काढ्यानें तास दोन तास शेकावें. ( ४ ) **सूज व पोटफुगी व अंगांत वारा मारीत असल्यास**—खसखशीचीं फुलें व बोंडें पाण्यांत उकळून त्या पाण्याचा शेक द्यावा. ( ५ ) **पुष्टि व बळ येण्यास**—खसखस, बदामगर व चारोळ्या समभाग घेऊन बारीक वाटून गाईचें दुधांत कालवून आटींव खीर करावी. उतरते वेळीं तींत २ तोळे साजूक तूप व तितकीच खडीसाखर घालून, निवत आली म्हणजे २ मासेपर्यंत गुळवेलीचें सत्त्व घालून सेवन करावी. याप्रमाणें सतत कांहीं दिवस केल्यानें बल व पुष्टि उत्तम प्रकारानें प्राप्त होते. हें औषध शक्तिहीन मुलांसही देण्यास फार उत्तम आहे. ( ६ ) **दारुणा** ( केंसांतील जमीन कठीण होऊन बारीक पुरळ उठतो त्या ) **रोगावर**—खसखस दुधांत वाटून मस्तकावर लेप करावा. (७) **मुलांस शक्तिवर्धक भक्ष्य**—खसखस गाईचे दुधांत बारीक वाटून त्यांत आणखी दूध व थोडा गूळ किंवा खडीसाखर घालून शिजवून रावडी तयार करावी व चांगली निवून थंड झाल्यावर खाऊं घालावी. हें भक्ष्य दोन महिन्यांहून अधिक वयाचे मुलांस देण्यास योग्य आहे; व ज्या मुलांस हगवणीचा उपद्रव असेल त्यांस तर फारच हितकारक आहे. ( ८ ) **अर्धांग वायूवर**—खसखशीचें तेल खोबऱ्याच्या तेलाबरोबर अंगास चोळावें.

### अफूचे उपयोग.

( १ ) **अतिसार व मोडशी यांवर**—अफू व केशर हीं समभाग घेऊन खलून अर्धा गुंजप्रमाणें गोळी मधाशीं द्यावी, म्हणजे मोडशी व सर्व प्रकारचे अतिसार दूर होतात. तसेंच गुंजभर अफू शेळीच्या दुधांत दिली असतां, त्यानेंही अतिसार दूर होतात. ( २ ) **मोडशीवर**—खोबऱ्याच्या तुकड्यावर छिद्र करून त्यांत २ गुंजा अफू घालून तो तुकडा निखाऱ्यावर भाजावा व खावयास द्यावा; म्हणजे मनुष्य सहसा दगावणार

नाहीं. ( ३ ) **पडशावर**—कागदास थोडी अफू लावून त्याची विडी करून ओढावी. ( ४ ) **डोकें दुखत असल्यास**—मस्तकावर अफूचा लेप करावा. ( ५ ) **अंगास कंडू सुटली असतां**—तेल, मेण व अफू एकत्र करून खलून लावावी. ( ६ ) **डोळे येतात त्यावर**—अफू व दांतवण यांचा लोखंडी पात्रांत निंबाच्या रसांत खल करून त्याचा लेप करावा. ( ७ ) **अतिशय घाम येत असल्यास**--त्यावर किंचित् अफू खावयास द्यावी. ( ८ ) **अफू**—ही स्तंभक आहे. **स्तंभनार्थ**—ही जायफळांत घालून, ती उंबराच्या, वडाच्या किंवा बाभळीच्या झाडास भोंक पाडून त्यांत ठेवतात; व ते भोंक बंद करून कांहीं दिवसांनीं ती बाहेर काढून तिच्या गोळ्या करून शक्ति पाहून देतात. साखरेबरोबरही अफू घेतात व वर दूध प्राशन करितात. तसेंच खसखशीचीं बोंडें व सुंठ यांचा षोडशांश काढा करून त्यांत गूळ घालून घेतात. ( ९ ) **पक्कातिसारावर**—खापरांत मंदाग्नीवर अफू भाजून ती खाली असतां कसाही पक्कातिसार असला तरी ती शमविते. ( १० ) **लहान मुलांस पडसें व सर्दी फार झाली तर**—डोक्यावर व नाकावर अफूचा लेप करावा. पोटांतील विकृतीस पोटावरही लेप करावा. ( ११ ) **अतिसारावर**—कांद्याच्या रसांत अफू मिळवून द्यावी. ( १२ ) **बदावर**—आधीं जळवा लावून रक्त काढावें व वर कडूनिंबाचा पाला बांधावा. नंतर दुसरे दिवसापासून अफूच्या बोंडांचा काढा करून त्यांत वस्त्र भिजवून तीन चार दिवस शेकावें; म्हणजे दुःख जलद नाहीसें होतें. ( १३ ) **नारूवर**—सर्पाची मेंग व अफू यांची वडी करून बांधावी. ( १४ ) **नासुरास**—मनुष्याचीं नखें जाळून त्या राखेंत अफू एक वाल मिळवून तें मिश्रण नासुरांत भरावें. ( १५ ) **आमातिसार व रक्तातिसार यांवर**—अफू निंबूचे रसांत कालवून ती दुधांत टाकून तीन दिवस प्यावी.

## अफूवर उतार.

[ १ ] मोहरीचें पीठ वगैरे वमन होणारीं औषधें द्यावींत. [ २ ]

रिठ्याचें पाणी करून प्यावयास द्यावें. अफूच्या पावशेर गोळ्यावर रिठ्याचे ५।७ थेंब पिळले असतां ती अगदीं निस्सत्व होते. ( ३ ) तीन किंवा चार मासे हिंग ताकांत अगर पाण्यांत वाटून द्यावा. किंवा नुसता हिंग खावयास द्यावा. अफूच्या डबींत हिंगाचा खडा ठेविला कीं, अफू निस्सत्व होते. ( ४ ) तुपांत टांकणखार व मोरचूद अथवा नुसता टांकणखार घालून पाजावा; म्हणजे उलटी होऊन अफू पडेल. ( ५ ) तुरटीचें चूर्ण व कपाशीच्या बियांचें चूर्ण एकत्र करून तें भक्षण केल्यानें अफू उतरते. ( ६ ) कांगोणीच्या वेलीच्या पानांचा रस पाजावा. ( ७ ) डोरलीचा रस दुधांत घालून द्यावा. ( ८ ) वेखंड व सैंधव एकत्र करून द्यावें. ( ९ ) पिंपळी व गेळफळ द्यावें. ( १० ) झेंडूच्या पाल्याचा रस काढून तो पाजावा. ( ११ ) थोडा मोरचूद भाजून निंबुटींत घालून चोखावा. ( १२ ) तांदुळजाच्या मुळ्या पाण्यांत वाटून तें पाणी द्यावें. ( १३ ) उटकटारीची मुळी पाण्यांत वाटून द्यावी. ( १४ ) गुळवेलीच्या काड्यांचा रस काढून पाजावा. ( १५ ) किंजळीच्या झाडाच्या पानांचा रस काढून द्यावा. ( १६ ) देवकपाशीच्या पाल्याचा रस द्यावा. ( १७ ) कडूनिंबाचे पाल्याचा अर्क द्यावा. ( १८ ) अंबाडीच्या पानांचा रस द्यावा. ( १९ ) चिंचेच्या पानांचा रस द्यावा. ( २० ) शिताफळीच्या बियांतील मगज पाण्यांत वाटून पाजावा. ( २१ ) लहान मुलास अफू चढल्यास त्यावर—कांदा फोडून त्याचा वास द्यावा; किंवा कोरा देशी कागद पाण्यांत कोळून पाजावा. गर्भिणीनें अफू किंवा अफू मिसळलेलें औषध सेवन करूं नये.

### १०१ खाजकोलती [ सं. धूमपुष्पा. ]

खाजकोलतीचीं झाडें लहानसर असतात. हीं पर्जन्यकाळीं उगवतात. खाजकोलतीचें पान अंगास लागलें तर अतिशय आग होते. या पानावर बारीक कुसें असतात. हीं पानें काळसर रंगाचीं असतात.

( १ ) **नारूवर**—खाजकोलतीचें मूळ ऊन पाण्यांत उगाळून नारूवर

लेप करावा. नारू बाहेर येऊं लागला म्हणजे तो वातीस गुंडाळावा. नंतर दुसरे दिवशीं तो तंतु बाहेर येईल त्यावर खाजकोलतीचें मूळ ४।५ वेळ लावावें. मग तंतूवर विंचवाची नांगी मारवावी; म्हणजे त्वरित सर्व नारू बाहेर येईल. ( २ ) **नायट्यावर**–खाजकोलतीची मुळी तुळशीच्या रसांत उगाळून लावावी.

## १०२ खिरणी ( सं. क्षीरिका. गु. रायणी. )

खिरणीस रांजणी असें म्हणतात. खिरणीचीं झाडें गुजराथ प्रांतांत फार होतात. हीं झाडें मोठीं होतात. खिरणीचीं पानें बकुळीच्या पानां-एवढीं असतात, व फळें कडूनिंबाच्या निंबोळ्यांप्रमाणें असतात. या फळांत चीक असतो. हें फळ खाण्यास मधुर आहे, परंतु फारच उष्ण आहे. खिरणीचें लांकुड कठीण व चिवट असतें म्हणून रंगारी लोक रंगविलेलें कापड बडविण्याकरितां याचे सोटे करितात.

**खिरणी**—मधुर, गुरु, तर्पण, वृष्य, स्थूलताकारक, हृद्य, शीतल, ग्राहक, स्वादु, तुरट, पाककाळीं आंबट, धातुवर्धक, मलस्तंभक, रुचिकर, पौष्टिक; व त्रिदोष, कृमि, मूर्च्छा, मोह, मद, तृषा, क्षतक्षय, रक्तपित्त, दाह, पित्त यांचा नाश करितें. हिचें फळ–तुरट, स्निग्ध, वृष्य; स्वादु, बलकर व शीत असून तृषा, मूर्च्छा, मद, भ्रांति, क्षय, त्रिदोष, रक्तदोष यांचा नाश करितें. ( १ ) **अपस्मार**–खिरणीच्या झाडावरील कांदे, फोफा-ट्यांत भाजून त्यांचा रस काढून त्यांत मध व पिंपळीचें चूर्ण घालून द्यावें. ( २ ) **वातपित्तप्रदर व रक्तपित्त यांवर**–खिरणी व कवठ यांचा पाला तुपांत भाजून त्याचा कल्क करून द्यावा. ( ३ ) **ऋतुप्राप्तीस**–खिरणीचे बियांतील मगज काढून त्यांची पोटळी धारण करावी.

## १०३ खिळखिळा.

हें झाड सुमारें पुरुषभर उंच होतें. याचीं पानें कढीनिंबाच्या पानां-सारखीं असतात. या पानांचा रंग गर्द हिरवा असतो. खिळखिळ्याचीं झाडें विशेषेंकरून डोंगराळ प्रदेशांत उत्पन्न होतात. कोंकणांत याची उत्पत्ति विशेष होते.

( १ ) महारोग व भूतबाधा यांवर—खिळखिळ्याच्या पाल्याची धुरी अंगास द्यावी.

## १०४ खुरासनी ओंवा.

( सं. खुरासाना. गु. खुरासानी यवान. हिं. खुरासानी आजवाईन. )

खुरासनी ओंवा हा पर्शिया देशांतील खुरासन व यवान या प्रांतांत पिकतो, त्यावरून हें नांव यास आलें आहे. हें बीज चपटें व बारीक असतें. हें पर्शियांतून या देशांत येतें. याचा वैद्यकांत बराच उपयोग सांगितला आहे.

खुरासनी ओंवा तिखट, रुक्ष, पाचक, ग्राहक, उष्ण, मादक, गुरु, वातकर व कफनाशक आहे. बाकींचे गुण ओंव्याप्रमाणेंच आहेत.

( १ ) **विषमज्वरावर**—तीन मासे खुरासनी ओंवा व नऊ मासे ज्येष्ठमध घेऊन यांचा काढा करून तो ताप येण्यापूर्वी द्यावा.

## १०५ ( खुळखुळा सं. शणपुष्पिका. )

जशीं तागाचीं झाडें असतात, तशींच खुळखुळ्याचीं झाडें असतात. यांत लहान व मोठी अशा दोन जाती आहेत. खुळखुळ्याचें झाड पुरुषभर उंच वाढतें. यास तागाच्या फळांप्रमाणें फळें येतात व ती वाळल्यावर खुळखुळ वाजतात; म्हणून यास खुळखुळा हें अन्वर्थक नांव मिळालें आहे. खुळखुळा हा कडू, वांतिकारक आणि रसबंधक आहे. हा अपस्मार, भूतबाधा, कंठरोग, हिक्का व श्वास यांचा नाश करितो. यास रानटी लोक " घाटसर्प " असें म्हणतात. क्वचित् काळा खुळखुळाही असतो.

( १ ) **अपस्मारावर**—खुळखुळ्याच्या फळांचा काढा अथवा धुरी द्यावी. ( २ ) **घाटसर्पावर**—खुळखुळ्याचीं फळें चिलमींत घालून ओढावीं म्हणजे तावडतोब घशांत भरलेला कफ मोकळा होऊन गुण येतो. ओढण्याची शक्ति नसल्यास दुसऱ्यानें ओढून त्याच्या नाकांत व तोंडांत धूर सोडावा. ( ३ ) **भूतबाधा झाल्यास**-खुळखुळ्याच्या फळांची धुरी द्यावी. ( ४ ) **नाकांत पीनस अथवा व्रण झाल्यास**—खुळखुळ्याच्या पानांचा रस नाकांत पिळावा.

## १०६ खैर (सं. खदिर. गु. खेर. हिं. खदिर.)

हा अरण्यवृक्ष आहे. सह्याद्रीच्या खालच्या प्रदेशांत याचीं रानें पुष्कळ आहेत. यास बारीक व कठीण कांटे असतात. यांचीं पानें शमीच्या पानांसारखी असतात. खैराचें लांकूड इमारतीचे कामास टिकाऊ असतें. यापासून कात उत्पन्न होतो. याचें लांकूड रेतींत कितीही वर्षें असलें, तरी तें कुजत नाहीं. सोटे, तंबूच्या मेखा वगैरे या लांकडच्या करितात. खैराच्या लांकडाचा गाभा कठीण असतो, म्हणून सुतार व लोहार हत्यारास त्याचा दांडा घालतात. उंसाचा रस काढावयास मजबूत चरक हवे असल्यास याचेच होतात. खैरापासून कात करण्याची कृति अशी आहे कीं, जून झालेला चांगला खैर पाहून तोडतात. नंतर त्यावरील साल तासून काढतात व मधील गाभ्याचे बारीक तुकडे करून ते एका डेऱ्यांत भरतात. मग भट्टी लावून त्यांचा रांधा करून काताच्या वड्या करितात. इमारती वगैरे बांधतात तेव्हां काताचें पाणी करून तें पाणी, अथवा खैराचें ओलें लांकूड सालीसह बारीक फोडून शिजवून अर्क काढून तो अर्क, चुना करितात त्यांत घातला असतां चुन्यास इतकी मजबुती येते कीं, तोफेचा गोळा देखील त्यावर एकाएकीं लागू होत नाहीं !

खैर—पाचक, शीत, रसकाळीं कडू, तुरट, रक्तशुद्धिकारक, दंताला हितावह; व कफ, पित्त, कृमि, व्रण, कुष्ठ, कंडू, ज्वर, शोथ, खोकला, मेद, प्रमेह, आम, अरोचक, पांडु व रक्तदोष यांचा नाश करितो. खैराचा डीक—मधुर, बलकर व धातुवर्धक आहे. खैराचा सार—( नार, साड ) वर्ण्य व विशद असून रक्तदोष, कफ व मुखरोग यांचा नाश करितो.

( १ ) उपदंश ( गर्मी ) रोगावर—खैर व असाणा यांचा काढा त्रिफलाचूर्ण घालून प्राशनार्थ द्यावा; म्हणजे सर्व प्रकारचे उपदंश दूर होतात. ( २ ) कुष्ठरोगांवर—खैराचे पंचांगांचा ( मूळ, पान, फुल, साल व फळ. ) काढा करून ठेवावा. त्यानें स्नान, पान, भोजन, उद्वर्तन व लेप द्यावा, म्हणजे सर्व कुष्ठें दूर होतात. तसेंच कुष्ठावर खैराचा कात उगाळावा. ( ३ ) भगंदरावर—खैरसाल व त्रिफळा यांचा काढा

करून त्यांत म्हशीचें तूप व वावडिंगांचें चूर्ण घालून द्यावें. ( ४ ) सोमलाचे विषावर—गाईचे दुधांत कात उगाळून द्यावा. ( ५ ) मुलांस मुबारकी रोग होतो त्यावर—या रोग्याचीं लक्षणें अशीं आहेत कीं, अजीर्ण होऊन पोटांत दूषित मळाची गांठ होऊन वरगड्या उडूं लागतात, गालावर सुजेची छाया दिसते, पोट फुगीर दिसतें, मूत्र पिंवळें होतें, व शक्ति क्षीण होत जाते. यावर खैराची अंतरसाल सुमारें २ मासेपर्यंत गाईचे दुधांत उगाळून त्यांत अर्ध्या उडदाइतकें गोरोचन उगाळून प्रत्यहीं प्रातःकाळीं एकवेळ याप्रमाणें ३ दिवस द्यावें. ( ६ ) तिडक्या प्रमेहावर—खैर, बाभळ व शमी या तिन्ही झाडांच्या कोंवळ्या तुंवऱ्या ( अंकुर ) एक तोळ्यापर्यंत समभाग मिश्र करून गाईच्या निरशा दुधांत वाटून सुमारें ५ तोळेपर्यंत रस काढून, त्यांत जिऱ्याची पूड चार गुंजा व खडीसाखरेची पूड अर्धा तोळा घालून, प्रत्यहीं दुवक्त याप्रमाणें ७ दिवस द्यावें. ( ७ ) खडतर घोडा वठणीस येण्यास—रोज त्यास ५ तोळे कात द्यावा. ( ८ ) मनुष्यास शीण झाला असतां त्यावर—खैराच्या सालीच्या रसांत हिंग घालून द्यावा. ( ९ ) प्रमेहावर आणि उन्हाळ्यांवर—खैराचे अंकुर ४ पैसे भार व जिरें एक पैसाभार घेऊन वाटून गाईच्या दुधांत कालवून वस्त्रगाळ करून त्यांत खडीसाखर घालून तें द्यावें. हें औषध दुवक्त द्यावें. ( १० ) खोकल्यावर—खैराची अंतरसाल ४ भाग, बेहेडेदळ २ भाग व लवंग १ भाग यांचें चूर्ण करून तें मधाशीं द्यावें. ( ११ ) कान फुटतो त्यास—पांढऱ्या काताची वस्त्रगाळ पूड करून ऊन पाण्यांत कालवावी; व त्याची पिचकारीप्रमाणें कानांत चूळ सोडावी. नंतर कान स्वच्छ धुवावा. ( १२ ) पित्तविकारावर—खैराच्या कोंवळ्या तुंवऱ्या १ तोळा घेऊन त्यांत तीन मासे सुंठ घालून बारीक वाटून ती गोळी गाईच्या निरशा दुधांत कालवून प्रति दिवशीं प्रातःकाळीं १ याप्रमाणें ३ दिवस द्यावी. ( १३ ) कुष्ठावर—खैराची साल व आंवळकाठी यांचा काढा बांवच्यांचें चूर्ण घालून द्यावा म्हणजे श्वेतकुष्ठ दूर होतें.

## १०७ खोकली.

हें झाड बरेंच मोठें होतें. सह्याद्रिपर्वतावर याची उत्पत्ति विशेष होते. या झाडाचीं पानें हिरड्याच्या पानांएवढीं मोठीं असतात. याची साल तेजळाच्या सालीसारखी जाड असून पिंवळ्या रंगाची असते. या झाडावर हरबऱ्याएवढीं फळें येतात. या झाडाची साल व फळें हीं फार तिखट आहेत. खोकलीच्या झाडास सांवरीप्रमाणें कांटे असतात.

( १ ) **खोकल्यावर**—खोकलीचें अर्धें फळ अथवा थोडी साल वाटून मधांत कालवून खावी, अगर सालीचा काढा करून द्यावा; म्हणजे थोडक्याच दिवसांत खोकला, दमा व वायुविकार हे दूर होतात.

## १०८ खोरेती. ( सं. फल्गु. )

या वृक्षास "खरवत" असेंही म्हणतात. हीं झाडें बहुतेक ठिकाणीं असतात. याच्या पानांवर करवतासारखे खरखरीत कांटे असतात. कोंकणांत सुतार लोक हीं पानें लांकडी काम साफ करावयास घेतात. तेणेंकरून लांकूड गुळगुळीत होतें. याचीं पानें व फळें बोकेड्याच्या पानां-सारखीं व फळासारखीं असतात.

( १ ) **नळगुदास**—खोरेतीच्या सालीचा रस ४ पैसेभार गाईचे दुधांतून ३ दिवस द्यावा. अथवा साल गोमूत्रांत उगाळून द्यावी. ( २ ) **कवलूवर**—खोरेतीचें पाळ गोमूत्रांत उगाळून द्यावें. ढाळ झाल्यास उतार-तूपभात. अथवा खोरेतीच्या फळांची भुकी नारळाच्या अंगरसांत द्यावी. ( ३ ) **मुलांचे पोटांतील डबा वगैरे विकारांवर**—खोरेतीची साल, चित्र-काची मुळी व आघाड्याची मुळी हीं गोमूत्रांत एकत्र उगाळून द्यावी. रेच झाला असतां उतार दहींभात ( ४ ) **डब्यावर व पांथरीवर**—खोरेतीची साल, पाणीशोक व नारळाची करवंटी हीं समभाग गोमूत्रांत उगाळून प्रत्यहीं दोन वेळप्रमाणें २१ दिवस द्यावीं. [ ५ ] **मानेवरील भागास व्रण झाला असल्यास**—खोरेतीच्या सालीचे रसांत फडकें भिज-वून त्याची ताळवेवर चौघडी घालावी व वरून एक फडकें सर्व मस्तकां-

भोंवतीं गुंडाळून त्याजवर वारंवार रस घालीत रहावें. याप्रमाणें ७ दिवस ही घडी सतत ठेवावी; व पथ्य करावें. ( ६ ) **डब्याचा उपद्रव न होण्यास**—महिन्यांतून दोन वेळां खोरेतीची साल गोमूत्रांत उगाळून देत जावी. ( ७ ) **गुल्मरोगावर**—खोरेतीचीं सुकलेलीं फळें अथवा साल व नारळाची करवंटी हीं, पांच तोळे गोमूत्रांत अर्धा तोळाप्रमाणें, उगाळून तें प्राशन करावें. ( ८ ) **दांत हालतात त्यास व दंतशूळावर**—खोरेतीच्या काष्ठानें दांत घांसावे, म्हणजे तीन दिवसांत दांत मजबूत होतात; व दुखत असल्यास राहतात. ( ९ ) **विटाळ येण्यास**—खोरेतीच्या फळांचें चूर्ण नारळाच्या अंगरसांत ३ अथवा ७ दिवस द्यावें.

## गंगावती.

हीस कोंकणांत " भांबुरडी " " भांवरूढ " असेंही म्हणतात. हींत लहान व मोठी अशा दोन जाती आहेत. मोठी सुमारें हात दोन हात उंच वाढते. हिचीं पानें मोठीं असून त्यांवर बारीक कुसें असतात. ही मळे जमिनींत होते. ही गांवांतही ओलसर जाग्यांत होते. धाकटी जात विहिरीवर किंवा पाण्याच्या कडेला होते. हीं झाडें बहुतेक प्रांतांत होतात. या झाडास पिंवळट रंगाचीं बारीक फुलें येतात. हिच्या पानांस दर्पट वास येतो. गंगावती ही उष्ण आहे. हीस " वनबावरी " असेंही नांव आहे.

**गंगावती**—तिखट, उष्ण, वातनाशक व व्रणरोपणी अशी आहे.

( १ ) **आगंतुक जखम झाल्यास त्यावर**—गंगावतीचा पाला हातावर चोळून तो जखमेवर बसवावा, म्हणजे ताबडतोब रक्त बंद होऊन जखम लवकर भरून येते. ( २ ) **पिसवा जाण्यास**—जेथें पिसवा झाल्या असतील तेथें गंगावतीची ओलीं झाडें आणून तीं जमिनीवर पसरून ठेवावीं; म्हणजे तिच्या दर्पानें पिस्वा नाहींशा होतात. ( ३ ) **मूळव्याधीवर**—गंगावतीचा रस एक तोळा व तूप एक तोळा एकत्र करून द्यावें. ( ४ ) **अर्धशिशीवर**—गंगावतीचा रस मस्तकास चोळावा व उन्हांत बसावें. असें एक दोन वेळ केले असतां अर्धशिशी ताबडतोब शांत होते.

## ११० गवती चहा ( सं. सुगंधी. )

गवती चहाचीं बेटें दर्भाच्या बेटांसारखीं मोठमोठीं वाढतात. यास 'पातीचा' चहा असें म्हणतात. बागाइतांत पाटाच्या कडेनें हीं लावतात. याची उंची सुमारें हात दीड हात असते. याचें तेल काढतात. तेंही औषधी आहे. या चहाचीं पानें कढींतही घालतात.

( १ ) ज्वरांत घाम निघावयास---याचा चहा करून घ्यावा; म्हणजे घाम निघून ताप कमी होतो. ( २ ) पोटदुखीवर-याचें तेल द्यावें. पटकीवरही हें गुणावह आहे. ( ३ ) सर्दी, पडसें, शैत्यज्वर, आगंतुक ज्वर व जडत्व यांवर—गवती चहा, सुंठ व खडीसाखर यांचा अष्टमांश काढा करून गरम प्यावा व पांघरूण घेऊन निजावें. या योगानें घाम येऊन शरीरांतील सर्दी निघून जाऊन हुषारी वाटते. हा काढा उष्ण आहे. समधात होण्याकरितां यांतच दूध घालून कोणी कोणी घेतात. ( ४ ) घाम येण्याकरितां वाफारा—एका मोठ्या भांड्यांत गवती चहाची जुडी टाकून त्यावर झांकण ठेवून आधण येईपर्यंत तें पाणी कढवावें; नंतर रोग्यास बाजेवर निजवून या पाण्याचा वाफारा द्यावा; म्हणजे घाम सुटतो. ( ५ ) पडशावर—गवती चहा व पुदिना किंवा दालचिनी व आलें यांचा काढा करून त्यांत गूळ घालून, रात्रीं निजावयाचे वेळीं प्यावा व उबदार वस्त्र पांघरून निजावें. याप्रमाणें तीन दिवस करावें.

## १११ गरवेल.

या झाडाची उंची सुमारें दोन हात असते. हें झाड सबजाच्या झाडासारखें असतें. याचीं पानें व मुळें फार कडू असतात. हीं झाडें माहुलीच्या किल्ल्यावर पुष्कळ होतात.

( १ ) पटकीवर-( कॉलऱ्यावर ) गरवेलीचीं मुळें तीन मासे व मोडसकांदा तीन मासे घेऊन, वाटून तें पोटांत घ्यावें, म्हणजे पटकीचा आजार तावडतोब दूर होतो.

## ११२ गहुला [ सं. अद्वय. ]

गहुल्याचें झाड फार मोठें होत नाहीं. याची उत्पत्ति उत्तर हिंदुस्थानांत विशेषेंकरून होते.

गहुला—तुरट, कडू, वृष्य, शीतल, केसांला हितावह; व वांति, भ्रांति, दाह, पित्त, रक्तरोग, ज्वर, मोह, घर्म, कुष्ठ, मुखजाड्य, तृषा, वातगुल्म, विष, मेद, मेह व रक्तपित्त, यांचा नाश करितो. याचें बीज तुरट, मधुर, शीतल, रूक्ष, ग्राहक, मलस्तंभकर, बल्य, पित्तनाशक, कफनाशक व आध्मानवायुकारक आहे. सुगंध गहुला—शीतल व सुगंधी असून कुष्ठ, दाह, ज्वर, रक्तविकार यांचा नाश करितो.

( १ ) गर्भिणीच्या रक्तस्रावावर—गहुला, कमलकंद व कोंवळीं उंबरें, हीं दुधांत शिजवून तें दूध प्यावें; व साखर तोंडीं लावून तांबड्या साळीचा भात खावा. ( २ ) आम्लपित्तावर—गहुल्याचें चूर्ण साखरेशीं द्यावें.

## ११३ गहूं [ सं. गोधूम. ]

सर्व धान्यांमध्यें गहूं श्रेष्ठ आहे; म्हणून त्यास धान्यराज असें म्हटलें आहे. गहूं हिंदुस्थानांत सर्वत्र पिकतो. इतर सर्व खंडांतही गहूं होतो. गव्हाचा रोपा २ हात उंच वाढतो. अव्वल काळ्या जमिनींत याचें पीक चांगलें होतें. उत्तर हिंदुस्थानांत गहूं पुष्कळ पिकतो. म्हणून तिकडील लोकांचें खाणें गहूंच आहे. जो गहूं शेतांत पाणी शिंपल्यावांचून होतो त्यास शेतगहूं, व जो पाणी शिंपून होतो त्यास मळेगहूं असें म्हणतात. गव्हाचें धान्य नीट ठेविलें असतां चार पांच वर्षें टिकतें. गहूं हें धान्य उंच प्रतीनें असून, याचे पदार्थ मनुष्याचे प्रकृतीस चांगले मानवतात. सर्व धान्यांपेक्षां गव्हांत पौष्टिकपणा जास्त आहे. गव्हांत पुष्कळ जाती आहेत; कांटे, हासे, बन्सी किंवा बक्षी, पोटे, खपले, दाऊदखानी अशा यांत पुष्कळ जाती आहेत. त्यांत बक्षी हे उत्कृष्ट प्रतीचे आणि खपले हे कनिष्ठ प्रतीचे आहेत. गव्हाच्या कोंवळ्या ओंब्याचा हुरडा भाजून

खातात. गव्हांचे जितके पदार्थ होतात तितके कोणत्याच धान्याचे होत नाहींत. गव्हांपासून घीवर, मांडे, जिलब्या, फेण्या, पोळ्या, लाडू अशीं अनेक पक्वान्नें होतात. या पक्वानांस तूप व साखर अवश्य पाहिजे. पांच सहा दिवस सगळे गहूं भिजूं घालून त्यांच्या सत्वाचा एक पदार्थ करितात; त्यास ' बदामी हलवा ' म्हणतात. तो पौष्टिक आहे. गव्हाच्या सत्वाची खीर करितात. ती पौष्टिक असते. ही अशक्तांस शक्ति येण्याकरितां देतात. गव्हाचा कोंडा गुरांस खावयास घालतात. कागद चिकटविण्यास याच्या पिठाची खळ फार चांगली उपयोगी आहे.

गहूं—( थोर ) स्निग्ध, मधुर, शीत, गुरु, धातुवर्धक, बलकर, कफकर, सारक, वर्ण्य, रुच्य, जीवन भग्नसंधानकारक, व्रणाला हितकर, स्थिरताकारक, आमाला करणारे; व वायु, पित्त यांचे नाशक असे आहेत. हे जुनें कफनाशक आहेत. गहूं [ बारीक ]--स्निग्ध, वृष्य, कफकारक, बलकर, मधुर, धातुवर्धक व पौष्टिक आहेत. वरकड गुण मोठ्या गव्हांसारखेच आहेत. [ १ ] **बदावर**—गव्हांच्या कणकीचें पोटीस ७।८ वेळ बांधावें; म्हणजे बद पक्व होऊन फुटेल. नंतर व्रणोक्त चिकित्सा करावी. **कोणतेंही गळूं पिकण्यास**—हेंच पोटीस बाधलें असतां तें पिकून फुटतें. [ २ ] **कामिणीवर**—गहूं घेऊन त्यावर पळी विस्तवांत लाल करून दाबावी, व तीस जो गव्हांचा घाम लागेल तो डोळ्यांत घालावा. [ ३ ] **शीघ्रप्रसूतीस**—गव्हांच्या सेवया आधणांत शिजवून, तें पाणी वस्त्रगाळ करून सुमारें अच्छेरपर्यंत घेऊन त्यांत साजुक तूप नवटांकपर्यंत घालून द्यावें. हें प्रसूतिसमयींचें जें पोट दुखणें सुरू होतें तें होतांच देववेल तर द्यावें. नंतर देऊं नये. [ ४ ] **अस्थिभंगावर**—किंचित् भाजलेल्या गव्हांचें चूर्ण मधाशीं द्यावें. हें कंबर व सांधे मोडले असतां त्यांवर उत्तम आहे. [ ५ ] **नारूवर**—गहूं व तागाच्या बियांचें चूर्ण तुपांत भाजून गुळांत गोळी करून द्यावी; व चुना आणि बिडलोण पाण्यांत वाटून लेप करावा. [ ६ ] **नाकांतून रक्त वाहतें त्यास**—साखर व दूध घालून गव्हांचें पीठ द्यावें. [ ७ ] प्रमेहावर अदपाव गहूं रात्रीं पाण्यांत

भिजत घालून सकाळीं वाटून वस्त्रगाळ करून, त्यांत खडीसाखर ५ तोळे घालून तें ७ दिवस द्यावें.

## ११४ गाजर. ( सं. गर्जर. )

गाजर, कंदासारखें जमिनींत होतें. हें लांबट असून याचा रंग तांबूस असतो. गाजराचें झाड हात सव्वा हात वाढतें. दिल्लीकडे जीं गाजरें होतात तीं सर्वोत्कृष्ट आहेत. गाजरें हिरवीं भाकरीबरोबर खातात, व त्यांची भाजी होते. तीं उकडूनही खातात. दुष्काळांत गरीब लोक गाजरावरच दिवस काढतात. गाई, म्हशी वगैरे गुरांस गाजरें खाऊं घातलीं असतां तीं पुष्ट होऊन दूध पुष्कळ देतात. गाजराचें बीं गर्भपातकारक आहे.

**गाजर**—मधुर, रुच्य, ग्राहक, कडू, तिखट, रक्तपित्तकारक, उष्ण, हृद्य, अग्निदीपक, नेत्रांला विकार करणारें, विदाही, रुक्ष, पित्तकर असून आध्मान, शूळ, मूळव्याध, कृमि, संग्रहणी, वात, पित्त, कफ, तृषा व शुक्र यांचा नाश करितें. याचें बीं उष्ण, वृष्य, गर्भपातकर असें आहे.

( १ ) **इसबरोगावर**—गाजरें किसून त्यांत थोडें मीठ घालावें व पाणी न घालतां त्यास वाफ देऊन तो कीस इसबावर बांधावा. यानें त्वरित गुण येतो. ( २ ) **ऋतु येण्यास**—गाजराचें बीं पाण्यांत वाटून ५ दिवस द्यावें.

## ११५ गांजा ( भांग ); ( सं. विजया. गु. हिं. गांजा. )

गांजाचें झाड सुमारें तीन हातपर्यंत उंच वाढतें. याचीं पानें अंबाडीच्या पानांसारखीं असतात. झाडावर तुरे येतात, त्यास गांजा असें म्हणतात. ते तुरे काढून सुकवितात. गांजाचा जो चुरा होतो त्यास भांग म्हणतात. ही भांग वाटून पितात, त्यास घोटा असें म्हणतात. गांजा ओढल्यापासून व भांगेचा घोटा प्याल्यापासून मनुष्यास निशा येते, त्याचें काळीज करपून जातें व शक्ति क्षिण होते, आणि त्या मनुष्यास एक प्रकारची तार येऊन त्या तारेंत तो मनुष्य अगदीं धुंद होऊन जातो,

पाहिजे तें बहकतो, असें हें दुर्व्यसन आहे. हें व्यसन ज्या मनुष्यास जडलें असतें त्यास गांजेकस म्हणतात.

भांग-पित्तल, तीक्ष्ण, ग्राहक, लघु, कर्षणकारक, अग्निदीपक, रुचिकर, मादक, वाणीचा वर्धक, मोहकारक; व कफवायु, यांची नाशक आहे. [ १ ] उन्हाळे लागतात त्यास-भांगेचा घोटा शक्त्यनुरूप द्यावा. [ २ ] मूळव्याधीवर धुरी-भांग व गुरांच्या शिंगाचें मोड यांची धुरी द्यावी. [ ३ ] बैल किंवा रेडे रक्त मुततात त्यावर-भांग, बडीशेप व वेलची एकत्र करून वाटून शक्तीप्रमाणें पाजावें; अथवा भांग वाटून पाजावी. [ ४ ] अतिसारावर—गांजाचें चूर्ण गुळांत अथवा साखरेंत द्यावें. [ ५ ] श्वासावर—गांजाची राख मधांत द्यावी. [ ६ ] निद्रानाश, अतिसार, ग्रहणी व अग्निमांद्य यांवर-रात्रीं भांग भाजून तिचें चूर्ण मधाशीं द्यावें. [ ७ ] चातुर्थिक ज्वरावर-गुळांत भांग मिळवून त्याच्या बोराएवढ्या गोळ्या कराव्या, व ताप येण्यापूर्वी चार घटका एक गोळी द्यावी. [ ८ ] भूतज्वरावर-भांगेचे झाडाला सायंकाळीं बोलावून प्रातःकाळीं तिची मुळी काढून मस्तकीं बांधावी.

## १६ गिंधान.

ही वनस्पति वर्षायु आहे. हीस " गंधाटी, " व " किडामार " अशींही नांवें आहेत. हिची वेल असते. दक्षिण हिंदुस्थानांत ही नदीच्या किनाऱ्यांनीं काळ्या जमिनींत श्रावणमासीं उगवते. हिच्या पानांचा रस फार कडू व उग्र आहे.

( १ ) गुरांच्या क्षतांत किडे पडतात त्यास-गिंधानीचा रस अगर पाला वाटून क्षतावर लावावा, म्हणजे किडे मरतात. [ २ ] गजकर्णावर-गिंधानीच्या पानांचा रस एरंडेलांत मिसळून लावावा. [ ३ ] पोटदुखीवर-हिचीं दोन पानें पाण्यांत कोळून द्यावीं. [ ४ ] लहान मुलांस मळ साफ होण्यास-हिचीं पानें बेंबीवर बांधावीं. [ ५ ] शीतज्वर व संततज्वरावर—हिच्या पाल्याचा रस अंगास चोळावा; म्हणजे ज्वर तत्काळ जातो. [ ६ ] कृमींवर-गिंधानीचा रस काढून द्यावा; अगर

बियांचें चूर्णाची फकी द्यावी. ( ७ ) सुजेवर–गिंधान, समुद्रफळ, मालकांगोणी व मिरीं हीं वाटून त्यांचा लेप करावा.

### ११७ गुग्गुळ ( सं. गुग्गुलु. गु. हिं. गुग्गुळ. )

याचीं झाडें मारवाड व सिंध या देशांत होतात. हीं झाडें सिंगापूर बेटांत फार आहेत. ग्रीष्मऋतूमध्यें उन्हानें हीं झाडें तापून स्रवतात व त्यांतून जो चीक निघतो, त्यास गुग्गुळ असें म्हणतात. याचा धूपाकडे पुष्कळ उपयोग होतो. याचा धूप केल्यानें हवा शुद्ध होऊन हवेंतील रोगकारक द्रव्यें नाश पावतात. हा याच्यापासून अतिशय मोठा उपयोग आहे. देवास नित्य धूप दाखविण्याचें मूळ कारण तरी हेंच असलें पाहिजे.

गुग्गुळ हा महिषाक्ष, महानील, कुमुद, पद्म, हिरण्य या भेदेंकरून पांच प्रकारचा आहे. तो कडू, तिखट, उष्ण, रसायन, विशद, पित्तल, सारक, तुरट, लघु, पाचक, वृष्य, मोडलेल्या हाडाचें संधान करणारा, सूक्ष्म, स्वर्य, अग्निदीपक, बुळबुळीत, मधुर, बल्य, तीक्ष्ण, स्निग्ध, सुगंधि, पौष्टिक, कांतिकर आणि मेदकर असा आहे. हा कफ, वायु, कास, कृमि, वातोदर, श्लेष्म, सूज, अर्श, प्रमेह, मेदोरोग, वातरक्त, रक्तदोष, ग्रंथिरोग, गंडमाळा, व्रण, अपची, पीटिका, आंव, कंडू, कुष्ठ, छर्दि, आमवायु व अश्मरी यांचा नाश करितो. हा नवा असतां धातुवर्धक व वृष्य आहे व जुना असतां अति लेखन आहे. १ महिषाक्ष ( म्हशा गुग्गुळ ) व २ महानील हे हत्तींचे उपयोगी; व ३ कुमुद आणि ४ पद्म हे अश्वाचे उपयोगीं व ५ हिरण्य हा मनुष्याचे उपयोगी आहे असें जाणावें. गुग्गुळ हा मधुर आहे म्हणून वातशमन; तुरट आहे म्हणून पित्तनाशक; व कडु आहे म्हणून कफनाशक, या प्रकारें सर्वदोषनाशक आहे असें जाणावें. **कणगुग्गुळ**—हा तिखट, उष्ण, सुरभी, रसायन; व वायु, शूल, गुल्म, उदर, आध्मानवायु व कफ यांचा नाशक आहे. भूमिज गुग्गुळ हा तिखट, कडू व उष्ण असा आहे; व कफ, वात, पिशाचबाधा यांना दूर करितो. गुग्गुळाची शुद्धि–त्रिफळयाचा काढा करण्यास एक

कल्हईचें पातेलें घेऊन त्रिफळा व त्याच्या बेतानें पाणी पातेल्यांत घालावें व त्यावर एक फडकें बांधून मग त्यावर गुग्गुळाचें चूर्ण घालून वर झांकण ठेवून तो गुग्गुळ शिजवावा; म्हणजे शुद्ध होतो. [ १ ] **कपाळ दुखतें त्यावर**–गुग्गुळ पाण्यांत उगाळून त्याचा कपाळावर लेप द्यावा, म्हणजे कपाळ राहतें. [ २ ] **कांखमांजरीवर**–गुग्गुळ व चिंचोका पाण्यांत उगाळून लेप करावा. [ ३ ] **दाढ दुखते त्यास**–गुग्गुळ व रक्त-बोळ उगाळून दाढेस लावावा. [ ४ ] **थंडीनें अंग ठणकत असल्यास**–गुग्गुळ व सुंठ एके ठिकाणीं उगाळून लेप करावा व शेंकावें. [ ५ ] **गोम चावल्यास**–गुग्गुळाचा धूर द्यावा. **योगराज गुग्गुळ**–वावडिंग, धने, हिंग, गजपिंपळी, पहाडमूळ, जिरें, अतिविष, पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रकमूळ, सुंठ अजमोदा, मोरवेल, वेखंड, रेणुकबीज, कपिला, भारंगमूळ, इंद्रजव, पांढरे शिरस व कुटकी या सर्व औषधांचे दुप्पट त्रिफळा आणि तिप्पट शुद्ध गुग्गुळ घालून गोळ्या कराव्या. त्या मधाशीं द्याव्या. म्हणजे ग्रहणी, वायु, वृद्धत्व, शुक्रार्तवदोष, पांडुरोग, अग्निमांद्य, हृद्रोग, त्वग्रोग, शूळ, प्रमेह, व्रण, मूळव्याध, अरुचि, वातरक्त, खोकला, अपस्मार, आणि राजयक्ष्मा यांचा नाश होतो. हा मुख्यत्वेंकरून रास्न्याच्या काढ्यांत देण्याचा संप्रदाय आहे. याप्रमाणें योजिला असतां आमवाताला फार गुणकारी होतो. हा गुग्गुळ बोपदेव शतकांत सांगितला आहे. **दुसरी योगराजगुटी**–सुंठ, पिंपळीमूळ, चवक, मिरीं, चित्रक, भाजलेला हिंग, अजमोदा, शिरस, जिरें, शहाजिरें, रेणुकबीज, इंद्रजव, पहाडमूळ, वाव-डिंग, गजपिंपळी, कुटकी, अतिविष, भारंगमूळ, वेखंड, मोरवेल, तमाल-पत्र, देवदार, पिंपळी, कोष्ट, रास्ना, नागरमोथा, सैंधव, वेलची, गोखरूं, हरीतकी, धने, बेहडा, आंवळकांठी, दालचिनी, वाळा, यवक्षार व तीळ, या प्रत्येकाचीं समभाग चूर्णें आणि सर्व चूर्णासमान शुद्ध गुग्गुळ घालून तुपाशीं भक्षण करावा. सर्व एकवट झाल्यावर गोळी करून तुपाच्या भांड्यांत भरून ठेवावा; व त्यांतून अर्धा तोळा मात्र भक्षण करावा. हा योगराजगुग्गुळ मुख्यत्वें जरा व व्याधि यांचा नाश करितो. हा घेतला

असतां मैथुन, भोजन व पान यांचा कांहीं नियम नको. हा संपूर्ण वातरोग, आमवात, अपस्मार, वातरक्त, कुष्ट, दुष्टव्रण, अर्शरोग, प्लीहा, गुल्म, उदर, आनाह, अग्निमांद्य, श्वास, कास, अरुचि, प्रमेह, नाभिशूळ, कृमि, क्षय, हृद्रोग, शुक्रदोष, उदावर्त व भगंदर यांचा नाश करितो. हा तीन माशांपासून सात सात दिवसांनीं तोळ्यापर्यंत वाढवावा. हा सर्व वातरोगांवर रास्न्याच्या काढ्याशीं, मेहावर दारुहळदीच्या काढ्याशीं, वातरक्तावर गुळवेलीच्या काढ्याशीं, पांडुरोगावर गोमूत्राशीं, मेदोवृद्धीवर मधाशीं, कोडावर निंबाच्या काढ्याशीं, शूळावर मुळ्याच्या काढ्याशीं, उंदराचे विषावर पाडळमुळाचे काढ्याशीं, उग्र नेत्ररोगावर त्रिफळ्याचे काढ्याशीं, आणि संपूर्ण उदरांवर पुनर्नवादि काढ्याशीं द्यावा. कैशोरक गुग्गुळः—गुळवेळ २ शेर, गुग्गुळ १ शेर, व त्रिफळा १ शेर घेऊन १६ शेर पाणी घालून काढा करावा; आणि ८ शेर उरला म्हणजे गाळून पुनः उकळावा. तो घट्ट होत चालला म्हणजे त्यांत हीं पुढील औषधें घालावीं. मिरें, पिंपळी, वावडिंग, सुंठ व त्रिफळा हीं दोनदोन तोळे चूर्ण करून घालावीं. निशोत्तर आणि दंतमूळ हीं एकेक तोळा घालावीं. गुळवेल ४ तोळे बारीक करून घालावी. तें सर्व घट्ट झालें म्हणजे गोळ्या तीन तीन माशांच्या कराव्या. हा कैशोरक गुग्गुळ—सूज, व्रण, गुल्म, कुष्ठ, उदर, वातरक्त, खोकला, अग्निमांद्य, पांडु आणि प्रमेह यांस दूर करितो. द्वात्रिंशक गुग्गुळ—त्रिकटु, त्रिफळा, नागरमोथा, वावडिंग, चवक, चित्रक, दालचिनी, वेलदोडे, पिंपळमूळ, शैराणी, देवदार, पुष्करमूळ, कोलिंजन, अतिविष, दारुहळद, बाफळी, जिरें, बडीशेप, धमासा, पादेलोण, वावडिंग, जवखार, टाकणखार, गजपिंपळी व सैंधव हीं एकएक भाग व या सर्वांच्या बरोबर गुग्गुळ घेऊन रीतीप्रमाणें सिद्ध करून बोराप्रमाणें गोळी करून मधाबरोबर किंवा तुपाबरोबर प्रातःकाळीं भक्षण करावी; म्हणजे आम, उदावर्त, अंत्रवृद्धि व गुदकृमि यांचा नाश करील. तसेंच महाज्वर, भूतबाधा, आनाह, उन्माद, कुष्ठ, पार्श्वशूल, हृद्रोग, गृध्रसी, हनुस्तंभ, पक्षाघात, अपतानक, शोफ, प्लीहा, कामला व अपची हे रोग झालेल्या

मनुष्यांस ती हितकारक आहे. धन्वंतरिकृत हा मोठा योग सर्व रोगांचा नाश करणारा आहे. **विश्वाद्यगुग्गुळ**—शतावरी, एरंडमूळ, सुंठ, दारुहळद, कोष्ठ, सैंधव, रास्ना, गुळवेल आणि या सर्व चूर्णांच्या दुप्पट शुद्ध गुग्गुळ असे एकत्र करून त्याची एकेक गोळी खावी आणि पथ्य करावें; म्हणजे भ्रमवात नाश पावतो. **दुसरा प्रकार**—सुंठ, पिंपळमूळ, वावडिंग, देवदार, सैंधव, रास्ना, चित्रक, ओंवा, मिरीं, कोष्ठ आणि हरीतकी हीं समभाग व दुप्पट गुग्गुळ एकत्र करून तुपाशीं द्यावा; म्हणजे वायु, मोडशी, गुल्म, शूल, कंप व गृध्रसी यांचा नाश होतो. **रास्नादि गुग्गुळ**—रास्ना, गुळवेलीचें मूळ, एरंडमूळ, देवदार, सुंठ हीं एकेक भाग आणि या सर्वांबरोबर गुग्गुळ घेऊन एकत्र खलून खावा; म्हणजे वायु, शिरोरोग, नाडीव्रण, भगंदर यांचा नाश होतो. **कांचनार गुग्गुळ**—कांचन वृक्षाची साल १० पल-प्रमाण ( ४० तोळे ) व हिरडा, बेहडा, आंवळकांठी हीं तीन औषधें दोन दोन पलप्रमाण, एकूण ६ पलें; सुंठ, मिरें, पिंपळी ही तीन औषधें पलप्रमाण; वायवरणा एक पल; आणि विलायची, दालचिनी, तमालपत्र हीं एकेक कर्ष-प्रमाण ( तोळा ) घ्यावीं; मग सगळीं औषधें कुटून चूर्ण करून, त्यांच्या समभाग गुग्गुळ ( शुद्ध केलेला ) वाटून त्यांत हें चूर्ण मिळवून एक गोळा करून मग त्याच्या गोळ्या शाण-प्रमाण ( ४ मासे ) बांधून प्रातःकाळीं सुंठीच्या काढ्यांत, अथवा खैराच्या अंतरसालीच्या काढ्यांत अथवा हरीतकीचे काढ्यांत, अथवा ऊन पाण्यांत एकेक गोळी घेत जावी; तेणेंकरून मोठ्या दुर्धर अशा गंडमाळा व गंडमाळांचा भेद, अपची रोग, अर्बुद, फुटकुळ्या, व्रण, गुल्म, भगंदर हे रोग दूर होतात. त्रिफळागुग्गुळ हिरडा, बेहडा, आंवळकांठी, पिंपली हीं चार औषधें एकेक पल—( ४ तोळे) प्रमाण घेऊन चूर्ण करावें. मग शुद्ध केलेला गुग्गुळ ५ पल घेऊन चांगला वाटून त्यांत तें चूर्ण मिळवून कुटून गोळ्या करून रोग्याचे जठराग्नीचें बलाचें तारतम्य पाहून द्याव्या. तेणेंकरून विद्रधि, नाडीव्रण, गंडमाळा, भगंदर, सूज, गुल्म व मूळव्याध हे रोग दूर होतात. गोक्षुरादि गुग्गुळ—२८ पलें गोखरूं आणून थोडें

कुटून त्यांत ६ पट पाणी घालून अर्धें पाणी राहीतोंपावेतों काढा कढवावा. मग शुद्ध केलेला गुग्गूळ ७ पलप्रमाण घेवून चांगला कुटून अगर वाटून त्या काढ्यांत घालून फिरून गुळाचे पाकासारखा घट्ट होईपर्यंत पाक करावा. मग त्यांत चूर्ण करून टाकावयाचीं औषधें:—सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आंवळकांठी व नागरमोथा हीं सात औषधें पलप्रमाण घेऊन चूर्ण करून त्या पाकांत मिळवून एक गोळा करून मग त्याच्या गोळ्या बांधून ठेवाव्या. तेणेंकरून परमा, मूत्रकृच्छ्र, प्रदर, मूत्राघात, वातरक्त, वातरोग, धातूचा विकार व मूतखडा हे रोग दूर होतात. लाक्षादि गुग्गूळ—लाख, हाडसंधि, अर्जुनसादडा, अश्वगंध, नागबला आणि गुग्गुळ हीं एकेक पल घेऊन त्यांचें चूर्ण करून तें द्यावें. तेणेंकरून अस्थिभंग व मुक्तास्थि यांचा नाश होतो व अंगें वज्रासारखीं घट्ट होतात. आमादि गुग्गुळ:—बाभळीचें बीं, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा व आंवळकांठी हीं सर्व समभाग आणि सर्वांच्या समान गुग्गुळ घालून तो भग्नास्थीला सांधण्याविषयीं योजावा. हा तूप व मध यांशीं द्यावा. गुल्म व शूल यांवर–शुद्ध गुग्गुळ गोमूत्राशीं द्यावा. विडंगाद्यगुग्गुळ—वावडिंग, हिरडा, बेहडा, आंवळकांठी, सुंठ, मिरीं व पिंपळी, यांचे चूर्णाबरोबर शुद्ध गुग्गुळ घेऊन सर्व तुपांत खलून गोळी करून खावी व पथ्य करावें; म्हणजे दुष्टव्रण, नाडीव्रण, अपची, मेह व कुष्ठ यांचा नाश होतो. गुगुळादि लेप—गुग्गुळ, त्रिफळा, सुंठ, मिरें व पिंपळी हीं समभाग वाटून लेप करावा. तो दुष्ट अशा नाडीव्रणाचा व भगंदराचा नाश करितो. अमृतादि गुग्गुळ—गुळवेल, कडू पडवळाचें मूळ, सुंठ, मिरीं, त्रिफळा व वावडिंग यांचें समभाग चूर्णाबरोबर गुग्गुळ घालून, एक तोळ्याची गोळी करावी व ती दररोज एक खावी, ती व्रण, वातरक्त, गुल्म, उदर, पांडु व सूज यांचा नाश करिते. पथ्यागुग्गुळ—हिरडे १०७, बेहडे २००, आंवळे ४००, व गुग्गुळ ६४ तोळे हे १०२४ तोळे पाण्यांत रात्रीस भिजत घालून प्रातःकाळीं कढवून अर्धें शेष उरलें म्हणजे गाळून घेऊन पुनः लोखंडाचे पात्रांत कढवावें; आणि

उतरल्यावर त्यांत वावडिंग, दंतमूळ, त्रिफळा, गुळवेल, पिंपळी, निशोत्तर, सुंठ, मिरें या प्रत्येकाचें चूर्ण दोन तोळेप्रमाणें टाकावें. म्हणजे हा गुग्गुळ तयार होतो. यथेच आचरण व यथेच भोजन करणाऱ्या मनुष्यानेंही हा सेवन केला असतां रोगनाश करील. हा गृध्रसी, नूतन खंजता, प्लीहा, उग्र जठर, पंगुता, पांडूत्व, कंडू, कृमि व वातरक्त यांचा नाश करणारा आहे. हा मनुष्यास सामर्थ्यवान आणि बळेंकरून हत्तीसारखें व वेगेंकरून घोड्यासारखें करितो. व आयुष्य, चक्षुर्बल व पुष्टि यांस देतो; विषनाशक, व क्षत बरें करणारा असा हा योग सर्व रोगांच्या ठायीं वैद्यांनीं योजिला आहे. गुग्गुळास अपथ्य आंबट, तिखट, फार खाणें, मैथुन, श्रम, ऊन, मद्य, आणि क्रोध.

११८ गुंज. ( सं. गुंजा. गु. चणोटी. हिं. गुंजा. )

गुंजेचे वेल असतात. या वेलांचीं पानें बारीक व लांबोडीं असतात. गुंजेंत तांबडी व पांढरी अशा दोन जाती आहेत. दोहोंचेही वेल सारखेच असतात. गुंजा सोनें वजन करावयास उपयोगीं पडतात. या एक तोळ्यांत ९६ भरतात. गुंजांची उपविषांत गणना आहे.

गुंजा—स्वादु, कडू, बलकर, उष्ण, तुरट, त्वचेला हितावह, केश्य, रुच्य, शीत, वृष्य; व नेत्ररोग, विष, पित्त, इंद्रलुप्त, व्रण, कृमि, राक्षस व ग्रहपीडा, कंडू, कुष्ठ, कफ, ज्वर, मुखरोग, शीर्षरोग, वायु; भ्रम, दमा, तृषा, मोह व मद यांचा नाश करिते. हिचें बीज—वांतिकारक व शूलनाशक आहे. हिचीं पानें विषनाशक आहेत. श्वेतगुंजा विशेषेंकरून वशीकरणाकडे घेतात. वरकड गुण गुंजेसारखेच आहेत. ( १ ) अर्धशिशीवर—गुंजेचें मूळ पाण्यांत उगाळून नस्य द्यावें, म्हणजे अर्धशिशी तत्काळ दूर होते. ( २ ) देवीनें डोळ्यांत फुलें पडलीं तर—मोगली एरंडाच्या चिकांत पांढरी गुंज उगाळून अंजन करावें. ( ३ ) वीर्यवृद्धीवर व धातु पडत असल्यास त्यावर—गुंजेचें मूळ दुधांत शिजवून साखरेशीं द्यावें. ( ४ ) डोक्यास चाई लागते त्यास—गुंजेचें मूळ अथवा फळ बिब्याच्या रसांत उगाळून त्याचा लेप करावा. अथवा गुंजा

मधांत अगर तुपांत खलून लावाव्या. [ ५ ] **आवाज साफ होण्यास**—पांढऱ्या गुंजेचा पाला चावून तोंडांत धरून त्यापासून वारंवार येणारा द्रव गिळावा. [ ६ ] **उष्णतेनें तोंडांत फोड वगैरे झाल्यास**—पांढऱ्या गुंजेचा पाला, कंकोळ व खडीसाखर हीं तोंडांत धरून त्यांचा द्रव गिळावा अथवा मूळ चावावें. [ ७ ] **लालमेहावर**—पांढऱ्या गुंजेचा पाला व मेंदीचा पाला समभाग घेऊन त्यांचा रस काढावा; व त्यांत दुदुर्लीचें मूळ उगाळून जिरें व खडीसाखर घालून द्यावें. हें औषध सात रोज, प्रत्यहीं दोन वेळप्रमाणें द्यावें. [ ८ ] **धावऱ्यावर**—पांढऱ्या गुंजेच्या पाल्याचा लेप करावा. [ ९ ] **परम्यावर**—गुंजेच्या पाल्याचा रस काढून तो पावशेर गाईच्या दुधांतून द्यावा. [ १० ] **पैणीस**—पांढऱ्या गुंजेच्या पाल्याच्या रसांत जिऱ्याची पूड घालून पोटांत ध्यावें. [ ११ ] **उन्हाळ्यांस**—पांढऱ्या गुंजेच्या पाल्याचा रस साखर व जिरें घालून द्यावा. [ १२ ] **उष्णानें कपाळ दुखत असल्यास**—पांढऱ्या गुंजेचें पाळ स्वच्छ धुवून उगाळावें, व फडक्यांत घालून नाकांत ७ दिवस पिळावें. [ १३ ] **उपदंशावर**—तांबड्या गुंजेच्या पाल्याच्या रसांत जिऱ्याची पूड व खडीसाखर घालून तो रस ७ दिवस द्यावा. [ १४ ] **शेंदूराचे विषावर**—गुंजेचा पाला ७ दिवस खावा. [ १५ ] **शिरोरोगावर**—गुंजेचें मूळ उगाळून नस्य द्यावें; म्हणजे डोळ्यांपुढें चक्रें येतात तीं, रातांदळें, नेत्रांस पटलें येतात तीं, अर्धशिशी व मस्तकशूळ हीं दूर होतात. [ १६ ] **वायुरोगावर लेप**—ज्या अंगांत वायूचा कोप असेल त्या जाग्यावरील केंस वस्तऱ्यानें काढून त्यावर गुंजा पाण्यांत वाटून लेप करावा. तेणेंकरून अपबाहुक, विश्वाची व गृध्रसी हे वायु व वायूसंबंधीं दुसऱ्या पीडा दूर होतात. [ १७ ] **ग्रंथि म्हणजे गांठीवर**—तांबड्या गुंजेच्या डाळी, चिंचुका व सोनकाव, थंड पाण्यांत उगाळून त्याचा लेप लावावा; एक लेप सुकल्यावर पुनः दुसरा लावावा. [ १८ ] **उपदंशावर** ( गर्मीवर )—पांढऱ्या गुंजेचें मूळ व पांढऱ्या जास्वंदीचें मूळ उगाळून पोटांत द्यावें; व गर्मीच्या चट्ट्यांसही हेंच लावावें. [ १९ ] **खोकल्यावर**—

पांढऱ्या गुंजेचें मूळ उगाळून द्यावें. [ २० ] **पापण्यांस होणाऱ्या पूय-अभिष्यंद रोगास**–गुंजा पाण्यांत शिजवून तें पाणी पापण्यांस लावावें; म्हणजे पू वाहून जाऊन पापण्यांचा दाह व सूज नाहींशी होते. [ २१ ] **गंडमाळेवर**—गुंजेचें मूळ व फळें यांच्या दुप्पट काढ्यांत एकपट तेल घालून पचन करावें. त्याचा अभ्यंग केला असतां दारुण गंडमाळेचा नाश होतो. [ २२ ] **तिमिररोगावर**–गुंजेचें मूळ बोकडाचे मूत्रांत उगाळून प्यावें. [ २३ ] **मस्तकास टक्कल पडतें त्यास**–गुंजा, हस्तिदंताची राख व रसांजन यांचा लेप करावा; म्हणजे त्या जाग्यावर त्वरित केस येतात.

## ११९ गुरमळ्या ( उमळ्या ).

गुरमळीच्या वेलाचे बुंद दोन अडीच विती रुंद असून तो शेंपन्नास हात उंच जातो. हे वेल दक्षिण कोंकणांतलि रानांत फार होतात. हा वेल पंचवीस तीस वर्षेपर्यंत वांचतो. याच्या फळाची आकृति जांभळासारखी असून किंचित् लांबट आहे. हीं फळें गरीब लोक भाजून किंवा उकडून खातात हीं फार खाण्यांत आल्यास त्यांपासून उपद्रव होतो.

## १२० गुलछबू ( सं. भरंजिका, नलिका ).

गुलछबूचें झाड लहान असतें. याचे कंद असतात. त्यांपासून याची उत्पत्ति होते. या झाडास कांद्यासारख्या पात्या येतात. त्यांतून एक दांडा दोन अडीच हात लांबीचा उत्पन्न होऊन त्यास तुरा येतो व त्या तुऱ्यांतून फुलें येतात. हीं फुलें जाड कळीचीं व लांबट असतात. यांस वास फारच मधुर व सुवासिक असतो.

**गुलछबू**–तुरट, स्निग्ध व लघु असून कुष्ठ, गलगंड यांचा नाश करितो.

[ १ ] **लहान मुलांस बारा दिवसांचे आंतच तांबड्या पुटकुळ्या येतात त्यास**–गुलछबूचें मूळ व हळद पाण्यांत उगाळून त्यांत थोडें लोणी घालून तें अंगास चोळावें; म्हणजे पुटकळ्या लवकर मावळतात.

[ २ ] **वळावर**—गुलछबूची मुळी दूर्वांचे रसांत गंधाप्रमाणें उगाळून त्याचा लेप द्यावा.

## १२१ गुलतुरा. [ सं. शंखोदरी. गु. गलतुरी. ]

याचीं झाडें लहान असतात. याचीं पानें रान तरवडाच्या पानांसारखीं असतात. यास जीं फुलें येतात त्यांस 'शंकराचीं फुलें' असेंही कोणी म्हणतात. पुष्कळ काव्यांत याचीं मुळें उपयोगीं पडतात. याचें लांकूड फार बळकट असतें. याचे खुंटे चांगले होतात. मोठें झाड बुंध्यापाशीं तोडलें तर त्याची पुनः फूट होऊन त्यास पुष्कळ खोडें फुटतात. यांत दोन जाती आहेत. एक पिंवळ्या फुलांची व दुसरी तांबड्या फुलांची. या झाडाचा विस्तार सर्व बाजूंनीं सारखा पसरून फांद्या जरा खालीं वाकतात. याची छाया गर्द होऊन जाते. यास बोटाएवढ्या जाड, चपट्या व चार पांच अंगुळें लांबीच्या शेंगा येतात, त्यांत सात आठ दाणे असतात. हे दाणे मुलें आवडीनें खातात. हे बरेच रुचकर लागतात. या झाडास कांटे असतात. याचीं झाडें बियांपासून व कलमें लावून होतात. याच्या फुलांस वास नसतो. फुलांचे झुबकेच्या झुबके येतात. याच्या फुलांचा हंगाम आषाढ, श्रावण, भाद्रपद या महिन्यांत असतो. एरवींही बारा महिने यास फुलें येतात. हीं झाडें शोभेसाठीं बागेंत लावतात. या झाडास शंकेश्वर, रासतुरा, कुंकुमकेशर असेंही म्हणतात. हा उष्ण असून कफ, वायु, शूल व आमवायु यांचा नाश करितो.

( १ ) **नाकांतून रक्त पडतें त्यास**—आंब्याची कोय दुर्वांच्या रसांत उगाळून नाकांत घालावी; व पोटांत गुलतुऱ्याच्या पाल्याचा रस, अळिता व मध घालून द्यावा.

## १२२ गुलबाशी. ( सं. नक्ता. )

हीस 'सायंकाळी' असेंही म्हणतात. हिचें झाड लहान असतें. पानें लहान असून लांबट व मृदु असतात. गुलबाशींत पांढरी, गुलाबी, पिंवळी, तांबडी, केशरी वगैरे रीतीनें अनेक रंग झाले आहेत. औषधास पांढरी गुलबाशी जास्त गुणावह आहे. गुलबाशी—वातल, शीताची व गलगंडाची नाशक व अपक्व अर्शाला शमविणारी आहे.

( १ ) **धांवरें व गळूं यांवर**—गुलबाशीचीं पानें तूप लावून शेकून गळवावर बांधली असतां आंतील नासकें रक्त निघून जातें; व गळूं बरें होतें. किंवा गुलबाशीचा कंद पाण्यांत उगाळून त्याचा वारंवार लेप करावा. ( २ ) **पुष्टतेवर**—पांढऱ्या गुलबाशीचे कंद आणून किसावेत आणि सावलींत वाळवून चूर्ण करावें; व तें तुपांत किंचित् परतून बदाम, पिस्ते, चारोळ्या आदिकरून मसाला घालून साखरेच्या पाकांत मिश्र करून वड्या कराव्या. हा पाक नित्य तोळा दोन तोळे खाऊन वर गाईचें निरसें दूध प्यावें; म्हणजे धातुस्थानाची कडकी जाऊन धातुवृद्धि होते व शरीर पुष्ट होतें. ( ३ ) **धातु पडते त्यास**—पांढऱ्या गुलबाशीचा कांदा गाईचे दुधांत उगाळून सात दिवस द्यावा. ( ४ ) **अंगांतील गर्मी झडून जाण्यास व रक्तशुद्धि होण्यास**—पांढऱ्या गुलबाशीचा कंद गाईचे निरसे दुधांत एक तोळापर्यंत उगाळून त्यांत खडीसाखर १ तोळा व जिऱ्याची पूड ६ गुंजा घालून दोन्ही वेळ द्यावें, व पथ्य करावें; म्हणजे त्वरित गुण येतो. ( ५ ) **निर्लोमकरण**—गुलबाशीचा कांदा पाण्यांत वाटून त्याचा लेप करावा; म्हणजे तेथील केंस गळून पडतात.

## १२३ गुलाब.

गुलाबाचें झाड सर्वत्र प्रसिद्ध आहे. हें लहान असतें. यास कांटे असतात. यांत गुलाबी, पिंवळट, पांढरा, तांबडा, वगैरे जाती आहेत. उत्तम गुलाबाचीं झाडें अरबस्तान व तुर्कस्तान येथें होतात. गुलाबाच्या फुलांचें अत्तर व गुलाबपाणी होतें. गुलाबाचे फुलांचा वास फार सुवासिक येतो. गुलाबाच्या कळ्या सारक आहेत. गुलाबपाणी हें थंड आहे. फुलांच्या पाकळ्यांचा गुलकंद करितात.

( १ ) **रेच होण्यास**—थोडच्याशा वाळलेल्या गुलाबाच्या कळ्या साखरेबरोबर खाऊन वर थोडें पाणी प्यावें, म्हणजे रेच होतात. अथवा कळ्या रात्रीं पाण्यांत भिजूं घालून तें पाणी सकाळीं गाळून प्यावें. दुसरा प्रकार–सुकलेल्या गुलाबकळ्या भातांत शिजवून तो भात तूप व साखर

घालून खावा, म्हणजे लवकर रेच होऊं लागतात. यानें ग्लानि वगैरे कांहीं न येतां रेचही साफ होतात. ( २ ) **गुलकंद करण्याची कृति**--उंची गुलाबाचीं फुलें घेऊन त्यांच्या पाकळ्या काढाव्या. व दुप्पट खडी-साखर घेऊन बरणींत किंवा लाखलोटच्यांत पाकळ्यांचे व साखरेचे थरावर थर द्यावे व त्याचें तोंड बांधून तें ८ दिवस उन्हांत टांगून ठेवावें. म्हणजे गुलकंद तयार होतो. गुलकंद हा दाहशामक, पित्तशामक व मल-शुद्धि करणारा असा आहे. ( ३ ) **गुलाबी अत्तर काढण्याची कृति**--पुष्कळ फुलें एका भाडच्यांत घालून उकळावीं मग त्यास कढ आला म्हणजे तें भांडें खालीं उतरून ठेवावें व थंड झाल्यावर अत्तराचा तवंग पाण्यावर येतो तो काढून कुपींत भरावा. एक मण फुलांपासून १ तोळाभर देखील अत्तर निघत नाहीं. म्हणून हें महाग विकतें. तवंगाखालीं जें पाणी रहातें त्यास गुलाबपाणी म्हणतात. ( ४ ) **गुलाबी सरबत**—गुलाबपाण्यांत खडीसाखर घालून सरबतीपाक केला असतां सुवासिक सरबत होतें. हें सरबत उष्णतेचा नाश करणारें, थंड, व उन्हाळ्याच्या दिवसांत सेवन करण्यास योग्य असें होतें. ( ५ ) **डोळ्यांची आग होते, किंवा तेज कमी झालें तर त्यावर**—गुलाबपाणी डोळ्यांत घालीत जावें. ( ६ ) **आंकडीस**—गुलाबपाणी टाळू शिवाय करून नाक, कपाळ व डोळे यांस कापसाच्या बोळ्यानें लावावें. ( ७ ) **प्रदर, धातुविकार, रक्त-मूळव्याध व पित्तविकार इत्यादिकांवर**—सकाळीं व त्याप्रमाणेंच सायंकाळीं गुलाबाचीं ताजीं फुलें दर वेळीं पांच पांच घेऊन तीं तीन मासे खडीसाखरेबरोबर खावीं व वर थोडें गाईचें दूध चवदा दिवस द्यावें. म्हणजे वरील विकार दूर होतात व शौचास साफ होतें. मूत्रस्था-नाचा दाह, ठणका, मूत्राची आरक्तता, पिंवळेपणा इत्यादि विकारांवर हें अप्रतिम औषध आहे. ( ८ ) **खरूज, गजकर्ण वगैरे त्वग्दोषांवर**—गुलाबकळीचें रेचक द्यावें, म्हणजे चांगला फायदा होतो. ( ९ ) **त्वग्दो-षांवर**--गुलकंद खावा, म्हणजे रक्तशुद्धि होऊन अंगांतलि गर्मी निघून जाते. ( १० ) **डोळ्यांची गरमी निघून जाण्यास**--सुरम्यास गुलाब-

पाण्याच्या २१ भावना देऊन तो डोळ्यांत घालीत जावा. (११) **त्वग्दोषावर**—कापूर, टांकणखार, गंधक व विशेषधूप यांचा गुलाबपाण्यांत खल करून वड्या कराव्या व ती वडी पाण्यांत उगाळून लेप करावा.

## १२४ गुळवेल.

( सं. गुडूची, अमृता. गु. गळो. हिं. गुलंच. )

गुळवेलीची वेल झाडाच्या आश्रयानें असते. कोठें कोठें खडकाच्या आश्रयानेंही असते. तीस खडकी गुळवेल म्हणतात. गुळवेलीची आंतील त्वचा हिरव्या रंगाची असते. हीस बारीक फळांचे घोस येतात. पुष्कळ दिवसांची गुळवेल असल्यास तिची जाडी पांदरीएवढी देखील असते. गुळवेल अनेक रोगनाशक आहे. ही कडवट आहे; परंतु इच्या गुणावरून ईस गुळवेल असें म्हणतात. गुळवेलीचें सत्त्व काढतात. तेंही अनेक रोगांवर चालतें. हें सत्व मोठें शक्तिवर्धक असें आहे. औषधास गुळवेल, शेर वगैरे विषारी झाडांवरील घेऊं नये. तिच्यावरील पांढरी साल व आंतील हिरवी त्वचा असते, ती काढून टाकून उपयोगांत आणली असतां ती चांगली गुणदायक होते.

**गुळवेल**—तुरट, कडू, वीर्यानें उष्ण, तिखट, ग्राहक, रसायन, बलकर, मधुर, अग्निदीपक, लघु, हृद्य, आयु:प्रद; व ज्वर, दाह, तृषा, रक्तदोष, वमि, वात, भ्रम, पांडुरोग, प्रमेह, त्रिदोष, कावीळ, आम, खोकला, दुष्टकृमि, रक्तार्श, वातरक्त, कंडू, मेद, विसर्प, पित्त व कफ यांचा नाश करिते. ही तुपाशीं वायूचा, गुळाशीं मलबंधाचा, साखरेशीं पित्ताचा, मधाशीं कफाचा, एरंडेलाशीं वायूचा व सुंठीशीं आमवायूचा नाश करिते. **गुळवेलीच्या पाल्याची भाजी**—तुरट, उष्ण, लघु, तिखट, कडू, पाककाळीं मधुर, रसायन, अग्निदीपक, बलकर, ग्राहक; व त्रिदोष, वातरक्त, तृषा, दाह, मेह, कुष्ठ, कामला व पांडू यांचा नाश करिते. **कंदगुळवेल**—उष्ण, तिखट; व ज्वर, सन्निपात, विष, वलिपलित व पिशाचबाधा यांचा नाश करिते. **गुळवेलीचें सत्व**—स्वादु, पथ्य, लघु, दीपन, चक्षुष्य, धातुवर्धक, मध्य, वय:स्थापक; व वातरक्त, त्रिदोष, पांडु, तीव्र-

ज्वर, वमि, जीर्णज्वर, पित्त, कावीळ, प्रमेह, अरुचि, दमा, खोकला, उचकी, अर्श, क्षय, दाह, मूत्रकृच्छ्र, प्रदर, व सोमरोग यांचा नाश करिते.

(१) **विषमज्वर वगैरे सर्व रोगांवर**—गुळवेलीचें वस्त्रगाळ चूर्ण १०० भाग, गूळ व मध सोळासोळा भाग व तूप वीस भाग घेऊन एकत्र गोळी करावी, आणि अग्निबल पाहून खावी. व हितकारक आणि परिमित असें अन्न खावें; म्हणजे कोणताही व्याधि होत नाहीं. इतकेंच नसून केंसांत पांढरेपणा, म्हातारपणा, ज्वर, विषमज्वर, प्रमेह, वातरक्त व नेत्ररोग हे होत नाहींत. हें उत्कृष्ट रसायन रोग दूर करणारें, बुद्धि देणारें, व त्रिदोषनाशक असें असून याच्या सेवनानें पुरुष १०० वर्षें वांचतो व दैत्यासारखा बलवान् होतो. यास कोणी अमृतरस असें म्हणतात. याच्या पुढें अन्यवस्तुमिश्रित रसायनें तुच्छ आहेत. ( २ ) **सर्पदंशांवर**—खडक्या गुळवेलीचा कंद आणून दुधांत शिजवून ठेवावा. हा सर्पाच्या विषावर थंड पाण्यांत उगाळून त्यांत रिठा उगाळून द्यावा. ( ३ ) **सर्व प्रमेहावर**—गुळवेलीचा अंगरस काढून तो पाषाणभेदाचें चूर्ण व मध, अथवा नुसती मध घालून द्यावा. ( ४ ) **कामीणरोगावर**—गुळवेलीच्या रसांत अथवा काढ्यांत मध घालून द्यावी; अथवा पानांचा कल्क ताकाशीं प्यावा. ( ५ ) **तिमिरादि नेत्ररोगांवर**—गुळवेलीचा अंगरस १० मासे वजन घेऊन त्यांत मध व सैंधव एकेक मासा घालून चांगलें मर्दन करून थोडथोडें अंजन करावें. म्हणजे तिमिर, कांचबिंदु, कंडू, लिंगनाश व बुबुळांवरील रोग दूर होतात. ( ६ ) **आमवातावर**—गुळवेल व सुंठ यांचा काढा द्यावा; किंवा गुळवेलीच्या काढ्यांत एरंडेल घालून द्यावें. ( ७ ) **पित्तरोगावर**—गुळवेलीचा रस व खडीसाखर हीं एकत्र करून खावीं, म्हणजे तत्काल पित्त दूर होतें. ( ८ ) **कफरोगावर**—गुळवेलीच्या काढ्यांत मध घालून तो द्यावी. ( ९ ) **अमृतादि काढा**—गुळवेल, एरंडमूळ व अडूळसा यांचा काढा करून त्यांत एरंडेल घालून प्यालें असतां, तो सर्व अंगांत संचार करणाऱ्या वातरक्ताला जिंकतो. **प्रकार २ रा**—गुळवेल व त्रिफळा यांचा काढा मध व पिंपळी घालून

नित्य घेतला असतां सर्व नेत्ररोगांस जिंकितो. **प्रकार ३ रा**—गुळवेल, सुंठ, आंवळकांठी, अश्वगंध व गोखरू यांचा काढा घ्यावा. तेणेंकरून शूलयुक्त वातिक मूत्रकृच्छ्र दूर होतें. **प्रकार ४ था**—गुळवेल, अडुळसा, कडू पडवळ, नागरमोथा, सातवीण, खैर, काळा वेत, कडुनिंबाचीं पानें, हळद व दारुहळद यांचा काढा करून घेतला असतां अनेक प्रकारचीं विषें, विसर्प, कुष्ठ, विस्फोट, कंडू, मसूरिका, ज्वर, शीतपित्त वगैरे विकार दूर होतात. **प्रकार ५ वा**—गुळवेल, सुंठ, नागरमोथा, हळद व धमासा यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून वातज्वरावर द्यावा. **प्रकार ६ वा**—गुळवेल व दशमुळें यांचा काढा द्यावा. त्यानें तेरा प्रकारच्या सन्निपातांचा नाश होतो. **प्रकार ७ वा**—गुळवेल, सुंठ, भारंगमूळ व व्याघ्रपर्णी यांचा काढा करून पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा. हा कास व श्वास यांना जिंकतो. **प्रकार ८ वा**—गुळवेल, सुंठ, कोरांटी, चिकणा, उटकटारी, पंचमुळें व नागरमोथा यांचा काढा करून तो थंड झाल्यावर मध घालून घ्यावा, म्हणजे तत्काळ सूतिकारोगाचा नाश होतो. **मूत्रकृच्छ्रावर**—गुळवेलीच्या रसांत मध घालून द्यावा. ( १० ) **मधुराज्वरावर**—गुळवेलीचा काढा मध घालून द्यावा. ( ११ ) **स्तनांत दूध येण्यास**—गुळवेलीचा काढा करून तो दूध घालून द्यावा. ( १२ ) **जंतावर**—गुळवेल व म्हशा गुग्गुळ हीं एरंडाच्या पानांच्या रसांत उगाळून पोटावर लेप करावा. ( १३ ) **जीर्णज्वरावर**—गुळवेलीच्या काढ्यांत चतुर्थांश मध किंवा पिंपळीचें ३ मासे चूर्ण घालून द्यावें. अथवा गुळवेलीचा हिम द्यावा. ( १४ ) **वातरक्तावर**—गुळवेल, सराटे व आंवळकांठी यांच्या काढ्यांत एरंडेल अथवा मध एक तोळा घालून ती द्यावी. अथवा गुळवेलीचे काढ्यांत एरंडमूळ घालून द्यावें. किंवा नुस्ताच काढा द्यावा. ( १५ ) **पित्तप्रदरावर**—गुळवेलीचा रस मध घालून द्यावा. ( १६ ) **सर्पाचे विषावर**—निंबावरील गुळवेल आणून पावशेर पाण्यांत वाटून प्यावयास द्यावी; म्हणजे उलटी होऊन विष उतरेल. ( १७ ) **अमृतादि काढा, सर्व ज्वरांवर**—गुळवेल, धने, कडू-

निंबाची साल, पद्मकाष्ठ व रक्तचंदन यांचा काढा द्यावा; म्हणजे तो जठराग्नीचें दीपन करून सर्व ज्वर दूर करितो. व दाह, लाळ पडते ती, तृषा, ओकारी व अरोचक हीं घालवितो. ( १८ ) त्रिदोषजनित वांतीवर—गुळवेलीचा काढा मध घालून द्यावा. ( १९ ) शीतपित्तावर—गुळवेलीचा काढा द्यावा. ( २० ) हृदयशूल व वातशूलावर—गुळवेल व मिरें यांचें चूर्ण उष्णोदकाशीं द्यावें. ( २१ ) अमृतादि काढा, सर्व वातरोगांवर—गुळवेल, एरंडमूळ, सुंठ, देवदार, रास्ना व हरीतकी, यांचा काढा प्रातःकाळीं द्यावा. ( २२ ) चातुर्थिक ज्वरावर—गुळवेल आंवळकांठी व नागरमोथा यांचा काढा द्यावा. ( २३ ) जीर्णज्वर, कफ, प्लीहा, कास, व अरुचि यांवर—गुळवेलीचे रसांत पिंपळी व मध घालून द्यावी. ( २४ ) सर्पदंशावर—ज्येष्ठमासांत गुळवेलीचा कंद स्वल्प आयासानें मिळतो तो आणून, त्याचे काप करून दुधांत शिजवून ठेवावे, व ते उगाळून पोटांत ध्यावें. शुद्धि नष्ट झाल्यास टाळवेवर फासण्या टाकून तेथें तो चोळावा. गुरांस देणें तो जिभेवर चोळावा, म्हणजे विष उतरतें. गुळवेलीचें सत्व काढण्याची कृति—गुळवेल आंब्यावरील अथवा निंबावरील चांगली जाड पाहून आणून, तिचे चार अंगुळें लांबीचे तुकडे करून पाण्यानें धुवावे. नंतर पाट्यावर ठेंचून कल्हईचे भांड्यांत चार प्रहर भिजत घालावे. मग ते हातानें चांगले कुसकरून अगर रवीनें घुसळून त्यांतील कुंच्या सर्व पिळून तें पाणी गाळून निवळत ठेवावें. कांहीं वेळानें त्यांतील सत्व तळास बसलें म्हणजे वरील निवळ पाणी सर्व ओतून टाकावें. नंतर त्यांत पांच सात वेळ पाणी घालून त्याची निवळ टाकीत जावी; म्हणजे तें सत्व शुद्ध व पांढरें सफेत होतें, आणि त्याचा कडवटपणा सर्व जातो. मग तें सावलींत सुकवून बाटलींत भरून ठेवावें. हें घेण्याचें प्रमाण अर्ध्या माशापासून दोन मासेपर्यंत आहे. बहुधा सर्व रोगांवर हें चालतें. याचीं अनुपानें पुढें लिहिल्याप्रमाणें जाणावीं. ( १ ) प्रमेहास—गाईच्या पावशेर दुधांत २ मासे द्यावें, अथवा त्रिफळा व साखरेंत द्यावें. ( २ ) जीर्णज्वरास—तुपसाखरेबरोबर किंवा

मध पिंपळीबरोबर अथवा गूळ व शहाजिऱ्याचे चूर्णाबरोबर. ( ३ ) **पांडुरोगावर**–तूप व मधांत अथवा दुधांत. ( ४ ) **दाहरोगास**–जिरें व साखरेबरोबर. ( ५ ) **वायूस**—तुपांत. ( ६ ) **पित्तज्वर व पित्तास**–साखरेंत. ( ७ ) **कफास**—मधांत. ( ८ ) **रक्तपितीस**—एरंडेलांत. ( ९ ) **आमवायूस व उदरास**—सुंठींत. ( १० ) **ज्वरास**—मधांत. ( ११ ) **शक्ति येण्यास**—गाईच्या धारोष्ण दुधांत खडीसाखर तोळाभर घालून त्यांतून मासा दोन मासे टाकून घ्यावें. ( १२ ) **ओकारीस**—साळीचे लाह्यांत. ( १३ ) **अरुचीस**—डाळिंबांत. ( १४ ) **मूळव्याधीस**—लोण्यांत. ( १५ ) **काविळीस**—द्राक्षांत. ( १६ ) **श्वास व कास यांस**—सुंठ, मिरें, पिंपळी व मधांत. ( १७ ) **उचकीस**–मधांत. ( १८ ) **क्षयास**–तूप, खडीसाखर व मधांत. ( १९ ) **मूत्रकृच्छ्रास**—दुधांत. ( २० ) **प्रदरास** ( धुपणीस )—लोध्रांत. ( २१ ) **सर्व मर्मस्थानचे रोगांस**—ताकांत. ( २२ ) **सर्व व्याधींस**–थंड पाण्यांत. ( २३ ) **कुष्ठास**–रानतुळशीच्या पाल्याच्या रसांत. ( २४ ) **गुल्मास**–सुंठींत. ( २५ ) **सर्व नेत्ररोगांस**—म्हशीच्या साजूक तुपांत. ( २६ ) **केंस काळे होण्यास**–माक्याच्या रसांत. ( २७ ) **अग्निमांद्यास**–गोरखमुंडीबरोबर. ( २८ ) **वलिवलित**—[ अंगास वळकट्या पडून केंस पांढरे होणें ] **या रोगावर**—गुळवेलीचें चूर्ण नित्य २ तोळे घ्यावें. ( २९ ) **धातुस्तंभास**—गुळवेलीचें पंचांग १ तोळा चूर्ण करून मधांत घ्यावें.

इति शुभमस्तु.



भाग २ रा समाप्त.

